मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास

नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)

सत्यमेव जयते

महाराष्ट्र शासन

मराठी भाषा विभाग

**राज्य मराठी विकास संस्था**

एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,

धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६

संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव


# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

ऑगस्ट - २०१७


- ❋ श्री. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर
- ❋ समकालीन चर्चापद्धती व त्यांतील काही दोष
- ❋ शेती, शेतकरी आणि शासन -- लेखांक - १७
- ❋ अभिव्यक्ती स्वातंत्र्य की स्वातंत्र्याची अभिव्यक्ती
- ❋ पुस्तक परीक्षण : 'ज्ञानरचनावादाचे यथार्थ दर्शन'
- ❋ पुस्तक परीक्षण : 'पुस्तकाच्या गावा जावे.........'
- ❋ जुने लेखन




अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ७०। अंक ११। ऑगस्ट २०१७
श्रावण/भाद्रपद शके १९३९
वार्षिक वर्गणी ४०० रुपये
या अंकाची किंमत रु. ४०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा, या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील, अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).
फोन : (०२०) २५६७४०९३.

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
नीता गायकवाड
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)
फोन : (०२१६७) २२०००६.



अनुक्रमणिका

# नवभारत

## ऑगस्ट २०१७

## अनुक्रमणिका


❖ **श्री. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर** ३

राजेंद्र डोळके

❖ **समकालीन चर्चापद्धती व त्यांतील काही दोष** १६

संतोष शेलार

❖ **शेती, शेतकरी आणि शासन – लेखांक - १७** २०

श्री. के. वनपाल

❖ **अभिव्यक्ती स्वातंत्र्य की स्वातंत्र्याची अभिव्यक्ती** २३

बाबूराव चंदावार

❖ **पुस्तक परीक्षण :**

**'ज्ञानरचनावादाचे यथार्थ दर्शन'** ३०

पंडितराव शा. पवार

❖ **पुस्तक परीक्षण :**

**'पुस्तकाच्या गावा जावे.........'** ३३

संग्राम थोरात

❖ **जुने लेखन** ३५

# श्री. श्रीपाद कृष्ण कोल्हाटकर

राजेंद्र डोळके

**प्रास्ताविक :**

"तात्या ती तलवार एक तुमची बाकी विळे कोयते"

"जिथे रंगली साधी भोळी जनाईची गाणी

तिथेच खेळे श्रीपादाची कलावती वाणी!!"

या शब्दांत गोविंदाग्रजांती ज्या श्रीपाद कृष्ण उर्फ तात्यासाहेब कोल्हटकर यांना गौरविले आहे त्या कोल्हटकरांची आणखी निराळ्या शब्दांत महती सांगण्याची काय आवश्यकता! ग. त्र्यं. माडखोलकरांनी तर त्यांना साहित्याच्या क्षेत्रातील 'युगप्रवर्तक' ठरविले आहे. माडखोलकरांनी त्यांना दिलेल्या या पदवीचा एकदम स्वीकार करावा की, नाही हा मुद्दा बाजुला ठेवला तरी अर्वाचीन मराठी काव्याच्या क्षेत्रात केशवसुतांनी ज्या अर्थाने क्रांती केली त्या अर्थाने नाटक, टीका व विनोद या क्षेत्रात कोल्हटकरांनी क्रांती केली असे निश्चित म्हणता येईल. एक बुद्धिनिष्ठ प्रतिभाशाली आणि नंतरच्या लेखकांना मार्गदर्शक म्हणून त्यांची कामगिरी निःसंशयपणे वाखाणण्यासारखी आहे. असे असताना देखील कोल्हटकरांच्या वाङ्मयाला प्रचंड टीकेला सामोरे जावे लागले. आपले वाङ्मय विस्मरणात गेल्याचे विदारक दृश्य कोल्हटकरांना आपल्या हयातीतच पहावे लागले. गडक-यांनी आपल्या गुरूच्या ज्या 'कलावती वाणी'चा गौरवपूर्वक उल्लेख केला ती वाणी कृत्रिम आणि क्लिष्ट, बेडौल आणि बोजड असल्याचे आरोप टीकाकारांकडून त्यांचेवर झाले. कोल्हटकरांच्या हयातीतच त्यांच्या वाङ्मयाची ही स्थिती होती, तर आजच्या तरुणपिढीला त्यांच्या साहित्यकर्तृत्त्वाची आणि त्यातील मौलिकतेची काहीच कल्पना नसल्यास त्यात आश्चर्य ते काय! या पार्श्वभूमीवर उदंड कीर्ती आणि तेवढीच उपेक्षा लाभलेल्या त्यांच्या साहित्याचे मूल्यमापन या लेखात करावयाचे आहे. पुढच्या अनेक पिढ्यांना मार्गदर्शक ठरलेले, परंतु विस्मृतीत गेलेल्या अनेक साहित्यिकांच्या साहित्याचे महत्त्व पुन्हा समाजासमोर येणे आवश्यक आहे, हाही उद्देश यामागे आहे. सर्वप्रथम कोल्हटकरांच्या नाटकांपासून सुरुवात करू.

**कोल्हाटकरांची नाटके**

मराठी पाचव्या इयत्तेत असताना किर्लोस्करांच्या 'शाकुंतल'ची कीर्ती कानावर पडून आपणही एक नाटक लिहावे असे त्यांना वाटले आणि त्यांनी एक तीन अंकी नाटक लिहिले. हे त्यांचे अगदी पहिले नाटक. त्यानंतर त्यांनी 'सुखमालिका' या नावाचे पाच अंकी नाटक लिहिले. 'सुखमालिका' हे नायिकेचे नाव होते. हे नाटक रंगभूमीवर येण्याची व 'किर्लोस्कर मंडळी'चे श्री. आण्णा किर्लोस्कर यांना दाखविण्याची त्यांची फार इच्छा होती. परंतु तसे धैर्य त्यांना शेवटपर्यंत न झाल्यामुळे हे नाटक रंगभूमीवर येऊ शकले नाही, असे त्यांच्या 'आत्मवृत्ता'वरून दिसून येते.

यानंतर 'वीरतनय' हे नाटक त्यांनी इ. स. १८९३ मध्ये लिहावयास घेतले. १८९६ मध्ये ते प्रसिद्ध होऊन त्याच वर्षी 'किर्लोस्कर मंडळी'तर्फे ते रंगभूमीवर आले. 'वीरतनय' नाटकापासून मराठी नाट्यवाङ्मयातील स्वतंत्र मनूला सुरुवात झाली असे म्हणतात. या नाटकाचा विषय 'विधुरविवाह' हा आहे. विधुरविवाह हा काही खळबळजनक विषय होऊ शकत नाही. 'विधवाविवाह' हा मात्र त्याकाळी तसा विषय होता. परंतु चमत्कृती अथवा वैचित्र्य कोल्हटकरांना फार प्रिय असल्यामुळे त्यांच्या वाङ्मयाप्रमाणेच विषयनिवडी मध्येही त्यांचे हे वैशिष्ट दिसून येते. 'वीरतनय' हा या नाटकातील मुलगा विधुरविवाह घडवून आणतो.

पुढचे नाटक 'मूकनायक' इ. स. १८९७ मध्ये कोल्हटकरांनी ते लिहिले व १९०० मध्ये ते 'विविधज्ञानविस्तारा'त प्रसिद्ध होऊन किर्लोस्कर मंडळीने ते रंगभूमीवर आणले. श्री. न. चिं. केळकर यांनी आपल्या

पाच आवडत्या पुस्तकांत मूकनायकाची गणना केली आहे तर डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना आपल्या वृत्तपत्राचे 'मूकनायक' हे नाव या नाटकावरून सुचले आहे. (पहा - 'श्रद्धांजली', माडखोलकर, पृ. ९) या नाटकाचा विषय सुरापान आहे. विक्रांत व सरोजिनी ही यातील नायक - नायिका आहेत. दारूबाज शरच्चंद्र हा सरोजिनीचा भाऊ आहे. शरच्चंद्र दारूच्या आहारी कसा जातो, दारू बृहस्पतीलाही कशी मूर्खशिरोमणी बनविते आणि दारूच्या धुंदीत आपल्या स्त्रीच्या पातिव्रत्त्यावरही संशय घेण्यापर्यंत त्याची मजल कशी जाते इत्यादी दारूचे अनर्थ परिणामकारक रीतीने दाखविले आहेत. मात्र गडक-यांच्या 'एकच प्याला' प्रमाणे या नाटकाचा शेवट शोकपर्यवसायी नसून आनंदपर्यवसायी आहे.

'गुप्तमंजुष' ह्या नाटकाचा लेखनकाल १८९९ असून पहिला प्रयोग १९०१ मध्ये झाला. १९०३ मध्ये किर्लोस्कर मंडळीने हे नाटक रंगभूमीवर आणले. या नाटकाचा विषय स्त्रीशिक्षण हा आहे. मंजूष म्हणजे पेटी. शिकलेल्या स्त्रियांना दागिन्यांचा फार सोस असत नाही. त्यामुळे गुप्त मंजुषांची त्यांना जरूरही लागत नाही, हा भावार्थ. शिक्षण हे स्त्रियांना देवतापदाप्रत नेणारे असते असे कोल्हटकरांना यात सांगावयाचे आहे.

इ. स. १९०६ मध्ये कोल्हटकरांनी 'मतिविकार' हे नाटक लिहिले. १९०७ मध्ये किर्लोस्कर मंडळी तर्फे ते रंगभूमीवर आले. हे नाटक 'स्त्रियांचा पुनर्विवाह' अथवा 'विधवाविवाह' या विषयाला वाहिले आहे. प्रथम पत्नीच्या निधनानंतर पुरुष द्वितीय विवाह करू शकतो, पण प्रथम पतीच्या निधनानंतर पांढरपेशा वर्गातील स्त्री ही विधवाच व उपेक्षित रहाते हे चित्र नाटकात रंगवून अशा स्त्रीच्या पुनर्विवाहास जनतेचे मत अनुकूल करून घेण्याचा प्रयत्न केला आहे.

यानंतरचे नाटक 'प्रेमशोधन'. या नाटकाच्या प्रथम आवृत्तीला प्रस्तावनेत कोल्हटकर लिहितात, "प्रस्तुत नाटक गद्यरूपाने १९०८ च्या मे महिन्यात लिहिले. परंतु त्यातील जुळ्यासंबंधाचा भाग प्रयोगास गैरसोईचा असल्यामुळे ते कित्येक दिवस तसेच पडून राहिले. १९१० साली किर्लोस्कर मंडळींच्या सूचनेवरून त्यास संगीताचे रूप देण्यात आले व त्यानंतर लवकरच त्याचे प्रयोगही सुरू झाले." ह्या नाटकात प्रयोगाच्या दृष्टीने एक काठीण्य होते. मूळ कथानकात नंदन व कंदन हे दोघे जुळे भाऊ कल्पिले होते. त्यामुळे सारख्या चेह-याची दोन माणसे असल्याशिवाय नाटकाचा प्रयोग यथार्थ होणे शक्य होत नव्हते. परंतु रूपसादृश्यामुळे जो घोटाळा 'कॉमेडी ऑफ एरर्स' मध्ये होतो तसा तो या नाटकाच्या शेवटी थोडा सोडला तर कुठेच होत नाही. 'विषमविवाह' हा या नाटकाचा विषय आहे. विवाहमंदिर प्रेमाच्या पक्क्या पायावरती उभारले तरच ते मंगलप्रद आणि कल्याणकारक होते ही या नाटकाची शिकवण आहे. नाटकाचा शेवट 'एवढीच इच्छा आहे की या जगात विषय संबंध कधीही घडून न येवोत' या वाक्याने झाला आहे.

पुढील 'वधूपरीक्षा' हे नाटक संगीत नसून गद्य आहे १९१४ मध्ये ते 'मनोरंजन छापखान्या'त प्रसिद्ध होऊन 'महाराष्ट्र नाटक मंडळी' व 'भारत नाटक मंडळी' व 'भारत नाटक मंडळी' यांनी ते रंगभूमीवर आणले होते. 'अनुलोम विवाह' हा या नाटकाचा विषय आहे. अनुलोम विवाह म्हणजे उच्च जातीचा पुरुष व कनिष्ठ जातीची स्त्री यांचा विवाह. यातील धुरंधर हा ब्राह्मण व त्रिवेणी ही शूद्र स्त्री यांचा विवाह ही मध्यवर्ती कल्पना गृहीत धरून कथानक गुंफले आहे. सोबत धागेताईतांचे रहस्य व गोंधळ हाही एक उपविषय नाटकात सहाय्यास घेतला आहे.

'वधूपरीक्षे' नंतरचे नाटक 'सहचारिणी'. इ. स. १९१८ मध्ये 'गंधर्व नाटक मंडळी'ने हे नाटक रंगभूमीवर आणले. या नाटकाची कल्पना 'पोल डी कॉक' या फ्रेंच कादंबरीकाराच्या कथेवरून सुचली असे कोल्हटकर आपल्या 'आत्मवृत्ता'त म्हणतात. यात दोन बायकांच्या दादल्यांची दुर्दशा दाखविली आहे. ही कल्पना त्यांना त्यांच्या कुटुंबातीलच वडील बंधूवरून सुचली. एका सहचारिणीपासून मूल होत नसल्यामुळे या नाटकाचा नायक रंगराव दुसरी सहचारिणी करतो. तिजपासून रंगरावला अनेक मुले होतात. या अनुषंगाने संतती वैपुल्याच्या प्रश्नांची मनोरंजक मांडणी झाली आहे. हे नाटक प्रहसनवजा आहे.

इ. स. १९१७ कोल्हटकरांनी 'परिवर्तन' हे नाटक लिहिले. त्यांना त्यांच्या स्वतःच्याच 'भयंकर जागृती' ह्या

काव्यावरून हे नाटक सुचले होते. 'स्त्रियांचे समान हक्क' हा या नाटकाचा विषय आहे. मुलगा झाला की, आईबापाचे मुख आनंदाने उजळून निघते, तर मुलगी झाली तर तेच मुख थोडेसे खिन्न होते हा अनुभव आपल्यामध्ये सर्वांनाच असतो. स्त्रीच्या जन्मापासूनच तिच्या वाट्याला ही उपेक्षा व पुरुषापेक्षा कमी महत्त्व तिला प्राप्त झालेले असते परिवर्तन नाटकात हेच आयुष्य पुरुषाच्या वाट्याला आल्याबरोबर एका आठवड्यात त्यांना ते कसे नकोसे झाले व स्वतःचे हक्क मिरविताना त्यांनी स्त्रियांना समान हक्क कसे दिले हे मनोरंजकरीतीने वर्णन केले आहे. हेही नाटक 'सहचारिणी'प्रमाणे विनोदप्रधान आहे. मात्र ह्यातील विनोद सहचारिणीतील विनोदाच्या तुलनेत जास्ती सुसंस्कृत व खोल आहे.

कोल्हटकरांच्या मनात जातिभेदविषयक कथानक बराच काळ घोळत होते. त्यातून इ. स. १९१८ मध्ये 'जन्मरहस्य' हे नाटक आकारास आले. 'प्रतिलोमविवाह' हा या नाटकाचा विषय आहे. प्रतिलोमविवाह म्हणजे उच्च जातीची स्त्री आणि कनिष्ठ जातीचा पुरुष यांचा विवाह. हे नाटक 'बलवंत संगीत मंडळी'ने रंगभूमीवर आणले. नाटकाच्या मध्यभागापर्यंत नायक रघुनाथ हा ब्राह्मण मानला जात असतो. मध्यभागी रहस्याचा स्फोट होऊन रघुनाथ शुद्र आहे, हे कळते. त्याचे 'जन्मरहस्य' गुप्त ठेवले जाते. नाटकात शेवटी नायक-नायिकेचा मृत्यू होतो.

'शिवपावित्र्य' हे नाटक इ. स. १९२४ मध्ये 'विस्तारा'तून प्रसिद्ध झाले. शिवाजी महाराजांबद्दल वाटत असलेला अमर्याद आदर व्यक्त करण्याकरिता त्यांनी हे नाटक लिहिले आहे. नाट्यपूर्ण प्रसंगांच्या आणि प्रयोगक्षमतेच्या दृष्टीने आवश्यक असलेल्या गुणांचा या नाटकात अभाव असला तरी छत्रपतींच्या रणभूमीवरील विजयापेक्षा त्यांनी मनोभूमीवर जुलमी राज्य करणा-या मदनाला जिंकण्यात दाखविलेल्या कौशल्याला नाट्यरूप देण्यात कोल्हटकरांनी त्यांच्या ठिकाणी असलेल्या मार्मिकतेचे व सद्भिरूचीचे प्रत्यंतर दाखवून दिले आहे.

'श्रमसाफल्य' हे नाटक कोल्हटकरांनी १९२८ साली लिहिले. 'यशवंत' मासिकातून ते प्रसिद्ध झाले होते. याचा विषय त्याच्या नावातच सूचित केला आहे. श्रमाचे महात्त्म्य तरुण पिढीला पटवून देण्याकरिता हे नाटक जन्माला आहे आहे.

'मायाविवाह' हेही नाटक कोल्हटकरांनी १९२८-२९ साली लिहिले होते. परंतु त्यांच्या हयातीत हे नाटक प्रसिद्ध झाले नाही. ह्यातील दोन उतारे त्यांच्या मृत्यूनंतर लगेच निघालेल्या 'विहंगम' मासिकाच्या जुलै १९३४ च्या अंकात पहिल्याने प्रकाशित झाले व संपूर्ण नाटक 'युगवाणी' मासिकाने १९४६ च्या जून-जुलै-ऑगस्टच्या तिजोड अंकात प्रसिद्ध केले. हल्लीच्या स्त्री-स्वातंत्र्याच्या काळात स्त्रियांवर बळजबरीचे आणि फसवणुकीचे प्रसंग येण्याचे प्रमाण फार वाढले आहे. त्यामुळे त्यांना धोक्याची सूचना देण्याकरिता या नाटकाचा जन्म झाला आहे.

**कोल्हटकरांच्या नाटकांचे मूल्यमापन**

याप्रमाणे कोल्हटकरांची बारा नाटके प्रसिद्ध आहेत. त्यांच्या सर्व नाटकांची नावे पंचाक्षरी आहेत. एवढेच नव्हे तर त्या नावांतील पहिली दोन अक्षरे व नंतरची तीन अक्षरे वेगवेगळी करून दोन वेगळे शब्द तयार होतात. त्यांच्या या वैशिष्ट्याचे अनुकरण राम गणेश गडकरी यांनीही केले आहे. त्यांच्याही सर्व नाटकांची नावे पंचाक्षरी आहेत. कोल्हटकरांचे एक 'शिवपावित्र्य' हे ऐतिहासिक नाटक सोडले तर बाकीची सर्व नाटके सामाजिक विषयाला - त्यातही पाच नाटके 'विवाह' त्या विषयाला - वाहिलेली आढळतात. श्री. वि. स. खांडेकरांनी कोल्हटकरांच्या बारा नाटकांचे दोन विभागात वर्गीकरण केले आहे. पहिली सहा व नंतरची सहा. पहिल्या सहात कोल्हटकरांच्या उच्च प्रतिभेचा अढळ होतो आणि ती विशेष गाजली. सातव्या नाटकापासून त्यांच्या लोकप्रियतेला ओहोटी लागली आणि रंगभूमीवर ती फारसा प्रभाव पाडू शकली नाही. कोल्हटकरांच्या नाटकांपासून मराठी नाट्यवाङ्मयात स्वतंत्र मनूला सुरुवात झाली असे समजतात. त्याअगोदरची नाटके ही प्रामुख्याने पौराणिक विषयांवरची व रूपांतरीत होती. कोल्हटकरांच्या नाट्यकृती स्वतंत्र आहेत. पाश्चात्त्य नाटककारांच्या धर्तीवरील त्याची गुंफण, चटकदार संवाद, विनोद, काव्यात्मकता, समाजातील दोषांचे दिग्दर्शन इत्यादींनी सांगोपांग सजलेले नाटक आदर्श म्हणून पुढे ठेवण्याची प्रवृत्ती कोल्हटकरांच्या नाटकांनीच निर्माण केली.

नाटके अनेक गुणांनी संपन्न असली तरीही त्यातील दोष काढून त्यांवर टीकाही भरपूर झाली. त्यांची कथानके स्वतंत्र आहेत. पण ती अत्यंत कृत्रिम, अतिरंजित, असंभाव्य आणि अशक्यप्राय वाटावी अशा स्वरूपाची आहेत. सत्याभास उत्पन्न करणे हे जर इतर कलांप्रमाणे नाट्यकलेचे कार्य असेल तर ते कार्य करण्यास कोल्हटकरांच्या नाटकाची कथानके असमर्थ आहेत. नाट्यतंत्राची उपेक्षा केल्यामुळे त्यांच्या नाटकात नाट्य उतरु शकले नाही. प्रा. ना. सी. फडके यांनी तर "स्वतःची बेअब्रू करून घेण्याचा उत्तम मार्ग कोणता या विषयावर विचार करता करता हे नाटक लिहिण्याचे श्री. कोल्हटकरांच्या मनात आले की काय नकळे!" असा अभिप्राय 'सहचारिणी' नाटकावर दिला आहे. ('आधुनिक मराठी वाङ्‍मयाचा इतिहास, भाग २, अ. ना. देशपांडे, पृ. २७२') १९११ साली खाडिलकरांचे 'मानापमान' हे नाटक रंगभूमीवर आल्याबरोबर रा. ग. गडकरी यांच्या शब्दांत सांगावयाचे म्हणजे, "कोल्हटकरांची नाटके बुधवारावर येऊन बसली. १९२० पासून तर आठवड्याला कोणताच वार त्यांच्या वाट्याला येईनासा झाला."

याप्रमाणे कोल्हटकरांच्या नाटकांवर टोकाची टीका झाली. पण त्यात खूप तथ्यांश आहे असे म्हणता येणार नाही. नाट्यतंत्र व कलागुण यामानाने त्यांची नाटके प्रयोगदृष्ट्या खूप यशस्वी झालेली नसली तरीही रंगभूमीवर त्यांचे भरपूर प्रयोग झाले होते. त्यामुळे ज्याप्रमाणात व ज्या शब्दांत टीकाकारांनो त्यांच्यावर टीकेची झोड उडविलेली दिसते, ती योग्य आहे असे म्हणता येणार नाही. त्यांच्या नाटकांबद्दल फक्त एवढेच झाले की, त्यांनी आपली नाटके लिहिताना भावनेच्या उत्कटतेपेक्षा बुद्धिला आणि कारागिरीला जास्त महत्त्व दिले. त्यामुळे प्रेक्षकांच्या हृदयाला ती थेट जाऊन भिडली नाहीत. कोल्हटकरांच्या सर्वच साहित्याला हे लागू पडते. कल्पनावैचित्र्याची जबरदस्त आवड असल्यामुळे साधे, सरळ लिहिणे त्यांच्या स्वभावातच नव्हते. किर्लोस्कर मंडळींच्या 'गुप्तमंजुष

नाटकाचा प्रयोग लोकमान्य टिळकांनी पाहिल्यानंतर "काय हो हा बुद्धीचा व्यय?" असे उद्‍गार काढले होते. त्यामुळे अतिरिक्त बुद्धिनिष्ठा हा एवढा एकच लहानसा दोष सोडला तर त्यांची नाटके उच्च दर्जाची आहेत व जाणकारांकडून ती वाखाणलीही गेली आहेत. या संदर्भात अच्युत बळवंत कोल्हटकरांचा एक मार्मिक अभिप्राय याठिकाणी देऊन हा मुद्दा संपवू. ते म्हणतात, "रा. रा. श्रीपाद कृष्ण हे महाराष्ट्रीय नाटककरांतील अग्रणी होत. त्यांच्या लेखनातील प्रसन्नता केवळ अवर्णनीय आहे. त्यांचे कल्पनाचातुर्य व कल्पकत्त्व याची तर कोणासही सर येणार नाही. त्यांच्यावर श्री. खाडिलकर, गडकरी, वरेरकर हे अतिप्रसिद्ध नाटककार झाले व त्यापैकी प्रत्येकाने श्रीपाद कृष्णांना खो देता देता शेवटी नाट्यसृष्टीत श्रीपाद कृष्ण यांना बसावयाला स्थानही उरविले नाही. तथापि एक गोष्ट प्राजळपणे कबूल केलीच पाहिले, की नाट्यरणरंगातील हा नेपोलियन बोनापार्ट जरी जळगांव - जामोरीच्या सेंट हेलीना बेटात आपल्या उत्तर आयुष्याचे दिवस घालवीत असला आणि जरी एखादा गडकरी वळणावरील बाल अभिमन्यूही त्यांचा पराभव केल्याचे आज सुख उपभोगीत असला, तथापि अजूनही नाट्यलेखनात श्री. श्रीपाद कृष्ण हेच सर्वांपेक्षा खास वरिष्ठ आहेत व त्यांच्या तोडीस उभा राहणारा नाटककार अजून तरी एकही नाही." ('बहुरूपी' या चिं. ग. कोल्हटकरलिखित पुस्तकातून, पृ. १३०)

**टीकाकार कोल्हटकर**

नाटकांप्रमाणेच टीकेच्याही क्षेत्रात कोल्हटकरांचे कर्तुत्व फार मोठे आहे. एवढेच नव्हे तर नाट्यक्षेत्रापेक्षाही ते अधिक मूलगामी आहे असे म्हटल्यास ते चुकीचे ठरू नये. कारण निरनिराळ्या साहित्यकृतींच्या परीक्षणनिमित्ताने व स्वतंत्रपणेही त्यांनी साहित्यातील घटकांची व तत्त्वांची जी पहिल्यांदाच चर्चा केली आहे ती तोपावेतो कोणीही केली नव्हती. यादृष्टीने कलात्मक टीकापद्धतीचा पहिला पाया त्यांनीच वाङ्‍मयात दृढमूल केला आहे, असे मानण्यात येते. त्यांच्या टीकालेखांचा संग्रह प्रथम इ. स. १९३२ मध्ये प्रसिद्ध झाला. त्यानंतर त्याची द्वितीय आवृत्ती १९७२ मध्ये दोन खंडांत प्रसिद्ध झाली. इ. स. १९६५ साली त्यांची साहित्यमीमांसा कळून यावी म्हणून त्यांचे काही लेख 'साहित्य विमर्श' हे पुस्तक काढून प्रसिद्ध करण्यात आले. या पुस्तकाला डॉ. व. दि. कुलकर्णी यांची प्रदीर्घ प्रस्तावना आहे.

स्वतंत्रपणे व निरनिराळ्या साहित्यकृतींचे परीक्षण करण्याच्या निमित्ताने त्यांचे टीकालेखन झाले आहे, हे वर आलेच आहे. त्यांचा एकही परीक्षणलेख असा नसावा की ज्यात त्यांनी एखादा वाङ्मयीन सिद्धांत मांडला नाही. काही काही कृतींचे परीक्षण तर त्यांनी विशिष्ट हेतूने केले आहे. त्यांचा अगदी पहिला टीकालेख 'विक्रमशशिकला' हा माधवराव पाटणकरांच्या नाटकाने होणारे संभाव्य दुष्परिणाम दिसून त्यांनी लिहिला होता. लेखाच्या अखेरीस 'अनीतीचा प्रसार या ग्रंथाने होण्याजोगा नसता तर आम्ही या ग्रंथाचा अव्हेर केला नसता' असे ते लिहितात. संस्कृतीतील संविधानकावर आधारित देवलांनी 'शापसंभ्रम' हे नाटक लिहिले आणि त्यांना इंदूरच्या महाराजांनी ठेविलेले एक हजार रुपयांचे बक्षीस मिळाले. यावर त्यांनी "शृंगारविषयक संगीत नाटकास आश्रय देणे हे परिणामी अहितकारक होय" असे मत व्यक्त केले. 'पण लक्षात कोण घेतो' या कादंबरीच्या परीक्षणात केशवपनासारख्या दुष्ट चालीचा निषेध करताना, सुधारकांविरुद्ध जे आक्षेप त्या काळी घेतले जात, त्याचीच त्यांनी प्रामुख्याने चर्चा केली आहे.

कोल्हटकरांच्या या पद्धतीमुळे सैद्धान्तिक विषयांनाच प्राधान्य मिळून मूळ कलाकृतीला, त्यातील गुणदोषांना कमी महत्त्व प्राप्त झाले आहे. 'पण लक्षात कोण घेतो'च्या बाबतीत हेच झाले आहे. तेवीस पानांच्या या परीक्षणात बावीस पाने सामाजिक सुधारणेवरील आक्षेपांचे खंडन यांस वाहिलेली असून एका पानात कादंबरीचा परामर्श आटोपलेला आहे. न. चिं. केळकरांच्या 'तोतयाचे बंड' या नाटकावरची कोल्हटकरांची टीका सर्वप्रसिद्ध आहे. हा एक लहानसा प्रबंधच म्हणाला लागेल. यात त्यांनी कलांचा उगम, ललितकला, त्यांचे साध्य, त्यांची साधने इत्यादींची स्वतंत्र व फार उपयुक्त चर्चा केली आहे. त्याचप्रमाणे 'हिंदुधर्म आणि सुधारणा', 'संगीत सौभद्र', 'गायकवाड सरकारची ग्रंथमाला', 'मराठी भाषेचे संप्रदाय व म्हणी', 'रागिणी व तिची भावंडे', 'नक्षत्रविज्ञान', 'ग्रहगणित' वगैरे त्यांच्या टीकालेखातून सूक्ष्म टीकापद्धती करण्याचे त्यांचे वैशिष्ट्य व कौशल्य आपल्या नजरेस येते.

ग्रंथपरीक्षण करण्याच्या निमित्ताप्रमाणेच साहित्यात असलेल्या स्थलकालनिरपेक्ष तत्त्वांचे विवेचन त्यांनी स्वतंत्रपणेही केले आहे. यवतमाळ येथील 'शारदाश्रमा' तर्फे विदर्भातील कवींचा निवडक कवितासंग्रह 'विदर्भवीणा' या नावाने इ. स. १९२७ मध्ये प्रसिद्ध करण्यात आला होता. या संग्रहाला लिहिलेल्या प्रस्तावनेत कोल्हटकरांनी 'रसविचार' मूलगामी पद्धतीने केला आहे. ते 'रस' आणि 'भाव' साधारणतः एकच मानतात. रस हा वर्ण्य व्यक्तिनिष्ठ असतो, असे मत ते व्यक्त करतात. कोल्हटकरांची 'रसविचारां'ची ही छाननी थोडी क्लिष्ट झाली. आहे. हे नमूद करणे आवश्यक वाटते.

'वैचित्र्य हाच काव्याचा आत्मा' हा त्यांचा एक दीर्घ लेख आहे. यात त्यांनी अनेक मूलभूत मुद्दे उपस्थित करून आपल्या गाढ चिंतनशीलतेची व मौलिक विचारसामर्थ्याची प्रचिती आणून दिली आहे. 'स्थलकाल-निरपेक्षतेने सत्य ज्ञान किंवा निर्भेळ आनंद देणारी भाषा म्हणजेच वाङ्मय होय' असे ते म्हणतात. त्यांच्या मते आत्यंतिक आनंदाची प्राप्ती करून देणारे वाङ्मय दुसरे तिसरे कोणते नसून काव्यवाङ्मयच होय. 'वैचित्र्य' हाच काव्याचा आत्मा असतो. वैचित्र्य म्हणजे आश्चर्य. वाचकांच्या अपेक्षित कल्पनांना धक्के देणे. अपूर्वता, वैलक्षण्य, चमत्कृती हे शब्दही 'वैचित्र्य' शब्दाचे पर्याय म्हणून कोल्हटकरांनी उपयोजिलेले आहेत. 'विषयवैचित्र्य', 'शब्दवैचित्र्य', 'वाक्यरचनावैचित्र्य', 'वाङ्मयप्रकार-वैचित्र्य', 'कथारचनावैचित्र्य' इत्यादी साहित्यात येणा-या अनेक घटकांचा वैचित्र्यसंदर्भात त्यांनी विचार केला आहे. कोल्हटकरांचे हे 'वैचित्र्य'पुराण मतभेदास पात्र असूनदेखील मराठी 'साहित्य' विवेचनात मोलाची भर टाकणारे झाले आहे, एवढे निश्चित.

'सारस्वत आणि गाणपत' हा त्यांचा साहित्यशास्त्रीय मते जाणून घेण्याकरिता आणखी एक महत्त्वाचा लेख आहे. रसिकानंद हा काव्याचा प्रधान हेतू असतो. काव्याचा आनंद हा त्यातील 'आत्म्या'प्रमाणेच बाह्य गोष्टींवरही अवलंबून असतो. ते म्हणतात, 'निव्वळ काव्यमय ग्रंथ वाचताना रसिकाचे चित्त काव्याच्या विषयाकडे असते, तसे कवीच्या कल्पनावैभव, योजनाचातुर्य, भाषासौंदर्य इत्यादी गुणांकडेही असते. शुद्ध काव्याच्या भाषेच्याच नव्हे तर कल्पनेचाही प्रत्येक अंश आनंदजनक असतो,

हा त्याचा विशेष आहे. वाङ्‌मय हा सामान्य शब्द मानून गाणपत व सारस्वत हे त्याचे प्रकार मानिल्यास अनेक शब्दांची योजना एकाच अर्थी न होता भिन्न अर्थी होऊन बरीच काटकसर व सोय होईल. 'सारस्वत' हा शब्द सरस्वती या शब्दापासून झाला आहे. सरस्वतीचे सौंदर्य तिच्या वीणानादाचे माधुर्य व तिच्या वाहनाच्या पिच्छाचे वैचित्र्य यावरून 'सारस्वत' हा शब्द ललित म्हणजे विदग्ध वाङ्‌मयासंबंधानेच योजण्यास विशेष योग्य दिसतो. विद्येचे दुसरे दैवत गणपती हे आहे. त्याचे बुद्धिवैभवदर्शक विशाल गंडस्थळ, ओबडधोबड चेहरा, कोणत्याही विषयात प्रवेश करण्यास समर्थ असे तीक्ष्णदंत यावरून ते दैवत शुद्ध शास्त्रीय वाङ्‌मयाचे दैवत होण्यास पूर्णपणे योग्य आहे व 'गणपती' या शब्दापासून होणारा 'गाणपत' हा शब्द शास्त्रीय वाङ्‌मय या अर्थी योजण्यास पात्र आहे असे वाटते.

याप्रमाणे साहित्यातील घटक आणि मूलतत्त्वे यांचे विवेचन करणारे त्यांनी अनेक लेख लिहिले आहेत. त्या सर्वांचा येथे विचार करणे शक्य नाही व आवश्यकही नाही. या सर्व टीकालेखनावरून एक गोष्ट लक्षात येते की, साहित्यातील तत्त्वे, घटक व प्रयोजन यांबद्दल त्यांच्या मनात निश्चित बैठक होती. त्यांची स्वतःची ठाम मते निर्माण झाली होती आणि भावनेच्या उमाळ्यापेक्षा बुद्धिनिष्ठ कारागिरीला त्यांच्या लेखी जास्त महत्त्व होते. म्हणूनच 'रस हा काव्याचा आत्मा' ह्या पारंपरिक मताला त्यांनी गौण लेखून 'वैचित्र्य हाच काव्याचा आत्मा' असे ठरविले. त्यांनी हे तत्त्व स्वतःचे साहित्य निर्माण करतानादेखील कसोशीने पाळलेले दिसते. कोल्हटकरांच्या अगोदर एवढी खोल व विस्तृत साहित्यमीमांसा मराठीत कुणी केल्याचे आढळत नाही. नाही म्हणावयाला विष्णूशास्त्री चिपळूणकर व हरिभाऊ आपटे यांची नावे थोडेबहुत आढळतात. परंतु ही अपवादभूतच म्हणावी लागतील. यादृष्टीने भारतीय व पाश्चात्त्य साहित्यशास्त्र यांचा तुलनात्मक व्यासंग करून थोडे मानसशास्त्राच्या अपेक्षेने व ब-याच प्रमाणात स्वतंत्र बुद्धीने साहित्याची विस्तृततेने मीमांसा करणारे कोल्हटकर हेच मराठीतील पहिले साहित्यमीमांसक ठरतात, असेच म्हणावे लागेल.

**विनोदपीठाचे आचार्य**

मराठी साहित्यमीमांसेच्या बाबतीत जसे ते अद्वितीय ठरतात तसेच विनोदाच्या क्षेत्रातही ते अद्वितीय ठरतात, नाटक आणि टीका या दोन्ही साहित्यप्रकारांच्या बाबतीत मुद्दाम मागे वळून पाहिले तर काही ना काही नाटककार आणि टीकाकार आपल्या हाताला लागतात तरी. पण विनोदाच्या बाबतीत तेही नाही. अगदीच काटेकोरपणे पाहिले तर विनोदी चुटके, पत्रे, विडंबने वगैरे प्रकार त्याकाळात समोर यायला लागले होते. या पार्श्वभूमीवर कोल्हटकरांचे विनोदी लेख प्रसिद्ध व्हायला लागले. त्यांच्या विनोदी लेखनाचा प्रवास त्यांनी स्वतःच आपल्या 'आत्मवृत्ता'त दिला आहे. ते म्हणतात, "माझ्या बहुतेक टीकांतून विनोदाची झाक दिसून येत असे ..... विनोदास स्वतंत्र स्थानच दिल्यास बरे होईल असे मला कित्येक दिवसांपासून वाटू लागले होते. त्या विचारास मूर्त स्वरूप १९०२ सालात मिळाले. त्याचे पूर्वी माझ्या वाचनात जेरोम, मार्क ट्वेन इत्यादी विनोदी ग्रंथकारांचे लेख आले होते. त्या लेखांच्या धर्तीवर 'साक्षीदार' हो लेख लिहून तो १९०२ साली प्रसिद्ध केला...... यानंतरचा माझा विनोदी लेख 'कुलूप' हा १९०३ साली प्रसिद्ध झाला. यानंतर त्याच साली पाच विनोदी लेख प्रसिद्ध झाले. त्यापैकी पहिला 'शिमगा' हा होय. 'कुलूप' या लेखातल्याप्रमाणे याहि लेखात हिंदुधर्मावर कोरडे ओढले असल्यामुळे या लेखांविरुद्ध अनेक कागाळ्या आल्या. त्यामुळे संपादकाच्या सूचनेवरून एक टोपण नाव धारण करून 'सुदाम्याचे पोहे' त्या नावाने लेखमाला पुढे सुरू ठेवली." (पृ. ४०)

पुढे कोल्हटकरांनी 'गणेशचतुर्थी', 'गवई', 'हजामतीची नीतिमीमांसा', 'भविष्यकथनाची साधने' इ. लेख लिहिले. १९०८ साली 'चोरांचे संमेलन' हा लेख 'मनोरंजनात' प्रसिद्ध झाल्यानंतर त्यांचे सर्व विनोदी लेख पुस्तकरूपाने प्रसिद्ध होण्याची कल्पना पुढे आली. परंतु त्या लेखांची संख्या पंधरा असल्यामुळे पुस्तक विशेष मोठे होण्यासारखे नव्हते. म्हणून कोल्हटकरांनी तीन लेखांची भर घालून अठरा लेखांचे पुस्तक काढण्याचे ठरले. सुदाम्यासारख्या दरिद्री ब्राह्मणाच्या पोह्यात अठरा विलग धान्ये दिसून यावयाचीच म्हणून 'सुदाम्याच्या पोह्यां'ना 'अठरा धान्यांचे

कडबोळे' हे वैकल्पिक नाव ठेवले. इ. स. १९१० साली प्रसिद्ध झालेले हे पुस्तक कोल्हटकरांनी प्रसिद्ध विद्वान राजारामशास्त्री भागवतांना अर्पण केले आहे. 'सुदाम्याचे पोहे' उर्फ 'साहित्यबत्तिशी' याची नवीन आवृत्ती कोल्हटकरांचे त्यानंतरचे लेख अंतर्भूत करून इ. स. १९२३ मध्ये प्रसिद्ध झाली. विद्वान राजारामशास्त्री भागवतांना अर्पण केले आहे. या वेळी कोल्हटकरांनी त्याला विस्तृत प्रस्तावना जोडून त्यात चातुर्वर्ण्य, जातिभेद हिंदू समाजातील अनिष्ट रूढी वगैरे धार्मिक समजुतींची चर्चा करण्यावर विशेष भर दिला आहे.

आपल्या विनोदी लेखनामागील हेतू सांगताना या प्रस्तावनेत ते म्हणतात, "प्रगतीची मजल आणखी पुढे नेण्याला विनोद हे मोठे साधन होत असल्यामुळे, 'साहित्यबत्तिशी'तील लेखांच्याद्वारे त्या साधनाचा उपयोग मी मुद्दाम केला. 'विनोदाचा उपयोग मी सामाजिक ऐक्यासाठी केला' असे ते ठामपणे सांगतात. असा प्रयत्न करताना 'कोणी जर त्यापासून दुखावले गेले असल्यास तो दोष माझ्या हेतूंचा नसून भाषेचा आहे, असे समजावे' असे ते म्हणतात. विनोदाची मीमांसा ओझरती देताना ते 'माझे टीकाकार' या लेखात म्हणतात, "अभिमानास थट्टेसारखे चांगले अंजन नाही, हा आपला नेहमीचा अनुभव आहे. मनुष्याला मूर्ख ठरविले, तर त्याला विशेष राग येतो. त्याला त्याच्या भोळेपणाचा व अज्ञानाचा राग आणावयाचा तर विनोदाचा आधार घेऊन तसे करावे लागते."

समाजातील मूर्ख लोकांच्या पदरी हा मूर्खपणा बांधण्याकरिता कोल्हटकरांनी 'सुदामा' नावाचे पात्र निर्माण केले. स्वतः सुदामा याखेरीज बंडूनाना व पांडूतात्या अशी आणखी दोन पात्रे त्यांनी निर्माण केली. कोल्हटकर तेल्हारा येथे असता तेथील कोर्टात बंडूनाना नावाचे एक सुनावणी कारकून व तात्याबा चांदेकर नावाचे एक जप्ती कारकून असत. त्यांच्या जोडीला वासुदेवराव पिंपळीकर नावाचे एक गृहस्थही होते. हे वासुदेवराव खाण्यात अतिशय तरबेज होते व यांना झोपही फार येत असे. त्यांनी एकदा एका बैठकीत एकोणवीस पेले चहा घशाखाली ओतला होता व दुस-या एके प्रसंगी लोणच्यानी भरलेल्या सहा-सात बश्या पार केल्या होत्या. त्यांच्या झोपेच्या सवयीमुळे त्यांच्या कितीतरी रेल्वेगाड्या प्लॅटफॉर्मवर त्यांच्या समोरूनच सुटल्या होत्या. बोलता बोलता थोड्या वेळेचा जरी खंड पडला तरी तेवढ्या वेळात ते झोपून घेत व घोरू लागत. त्या तीन मंडळींच्या स्वभावातील लकबी घेऊन त्यांनी बंडूनाना व पांडूतात्या ही दोन पात्रे रंगविली आहेत, अशी हकीकत ते आपल्या 'आत्मवृत्ता'त देतात.

कोल्हटकरांच्या विनोदात कल्पना व व्यवहार यांचे उत्कृष्ट मिश्रण आहे. वक्रोक्ति हा त्यांचा आवडता अलंकार त्यांच्या सर्व लेखनाप्रमाणे विनोदी लेखांतही प्राधान्याने दिसतो. 'धर्मांतर' त्या लेखात धर्मांतराचे स्वाभाविक व कृत्रिम प्रसंग वर्णन करून धर्मांतराच्या चळवळीवर अप्रत्यक्षरीत्या अतिशय कठोर अशी टीका केली आहे. 'चोरांचे संमेलन' या विरोधाभास अलंकारानी नटविलेल्या लेखात, तर कल्पनेचा विलास फार बहारीने केला आहे. त्याच दृष्टीने त्यांचे 'पांडुतात्याची निर्जळी एकादशी', 'आमच्या गावातील पाण्याचे दुर्भिक्ष्य' हेही लेख वाचनीय आहेत.

कोल्हटकरांचा विनोद हा मार्मिक आहे, मनुष्य-स्थभावाचे तिन्हीत्रिकाळ आढळणारे स्वभावविशेष सारखेच असणार. कोल्हटकरांनी नेमकेपणाने हेरून ते वाचकां-समोर ठेवले आहेत. त्यांच्या विनोद हा काही ठिकाणी खळाळून हसविणारा तर काही ठिकाणी चिंतन करावयास लावणारा आहे. कोणाला दुखविणारा त्यांचा विनोद नसून विदग्ध स्वरूपाचा आहे. अशिक्षित वाचकाला त्यांचा विनोद फारसा कळावयाचा नाही. तर तो कळायला तेवढीच बौद्धिक पातळी असणे आवश्यक आहे. त्यांच्या विनोदाची काही उदाहरणे पहा –

१) वकील (साक्षीदारास) :- तुमच्यापासून तिला एक मुलगा झाला होता ना?

साक्षीदार : माझ्यापासून होऊ नये तर काय... ..........(तुमच्यापासून)

२) या किल्लीरूपी स्त्रीचा पतीवर इतका पगडा असतो की, तिचा विरह झाल्यास कुलूप आपल्या धन्यालाही दाद देत नाही. कुलुपेही विवाहाच्या बाबतीत आर्यभूमीस पूर्णपणे शोभण्यासारखी असतात. कारण प्रत्येक कुलूपाला एकावेळी दोनदोन किल्ल्याही असतात. शिवाय दोन्ही

हरवल्यास तिसरी स्त्री करण्याची धर्माने त्यांना परवानगी आहे.

३) मी शिमग्यात शिव्या देतो. पण ठराविक 'दहावीस' शिव्यांखेरीज एकविसावी उच्चारीन तर शपथ!

४) कधी कधी चोराने घरात शिरून कडी लाविली असताहि, साक्षीदाराची चाहूल ऐकताच त्याने कडी उघडून व त्याला आत घेऊन नंतर त्याला साक्षी ठेवून चोरी केल्याचे आमच्या ऐकिवात आहे.

'धर्मांतर' हा त्यांचा शेवटला विनोदी लेख होय. १९२२ साली तो 'अरविंद' मासिकात आला होता. कोल्हटकरांच्या नाटकांप्रमाणेच त्यांच्या मागून येऊन त्यांच्यापेक्षा लोकप्रिय आणि प्रसिद्ध झालेले नाटककार ज्याप्रमाणे आढळतात त्याचप्रमाणे विनोदाच्या क्षेत्रातही चिं. वि. जोशी., आचार्य अत्रे, पु. ल. देशपांडे इत्यादी विनोदकार त्यांच्यामागून येऊन त्यांनी उदंड लोकप्रियता मिळविली. असे जरी असले तरी कोल्हटकरांच्या सूक्ष्मदर्शी प्रतिभेने आणि प्रगाढ जीवन चिंतनाने सभोवतालच्या वस्तुस्थितीतील जी वैगुण्ये आणि विसंगती दाखवून त्यातील हास्यास्पदता दाखविली आहे त्याला मराठी साहित्यात तोड नाही. त्यांनी निर्माण करून ठेवलेल्या पायवाटेवरूनच पुढच्या अनेक विनोदकारांचा प्रवास झाला आहे. म्हणून साहित्यसम्राट न. चिं. केळकरांनी त्यांना 'मराठी भाषेतील विनोदपीठाचे आचार्य' ही जी पदवी बहाल केली आहे, ती अगदी यथार्थ आहे असेच कोणीही म्हणेल.

**साहित्याच्या इतर प्रांतात विहार**

कोल्हटकर साहित्य-विमर्शक, नाटककार, विनोदकार इत्यादी नात्यांनी महाराष्ट्रभर विख्यात असले तरी इतर साहित्यप्रांतातही त्यांची कामगिरी झाली आहे. मात्र ती म्हणावी इतकी भरघोस नाही. त्यांनी 'दुटप्पी की दुहेरी' आणि 'श्यामसुंदर' त्या दोन कादंब-या लिहिलेल्या आहेत. दुटप्पी भासणा-या या कादंबरीतील नायकाने म्हणजे हरिहररावाने दुहेरी भूमिका धारण केली आहे. ते आपले प्रागतिक विचार एका नावाने आणि राष्ट्रीय विचार एका नावाने प्रसिद्ध करीत असतात. या कादंबरीला कथानक तसे नाहीच. स्वभावरेखन, मनोविश्लेषण यांवर भर देणारी त्यांची ही कादंबरी आहे. त्याचबरोबर मुख्य विषयांच्या अनुषंगाने साहित्यशास्त्रीय, सामाजिक आणि राजकीय प्रश्नांची मार्मिक आणि उद्‌बोधक चर्चा यात आहे. चर्चा या दृष्टीने ती फारच उपयुक्त आहे, परंतु कादंबरीत ती कितपत प्रस्तुत आहे हाच मतभेदाचा मुद्दा आहे. रहस्यप्रियता हा कोल्हटकरांचा स्वभावविशेष या कादंबरीतही डोकावतो.

'श्यामसुंदर' ही कोल्हटकरांची दुसरी कादंबरी. श्यामसुंदर हा या कादंबरीचा नायक वर्णाने श्याम व स्वभावाने सुंदर असतो. घरचा श्रीमंत आणि लाडावलेला परंतु मंदबुद्धीचा असतो, परीक्षेत नापास झाल्यामुळे वडील त्याला अतिशय रागावून बोलतात, त्यामुळे तो घर सोडून चालता होतो व चिमणपूरला येतो. काबाडकष्ट करून स्वतःचे पोट भरू लागतो. गावात तो समाजक्रांती घडवून आणण्याला सुरुवात करतो. शुद्रांचे शिक्षण, स्वच्छतेसंबंधी सुधारणा, निरक्षरता इत्यादी विषयांना प्राधान्य देतो. परंतु श्यामसुंदरच्या शत्रूंना ते सहन न होऊन ते त्याचा काटा काढण्याचा प्रयत्न करतात. त्याच्यावर हल्ला करून तो ओळखू न येण्याइतपत त्याच्या तोंडावर ॲसिड टाकून विद्रुप करतात. तरी तो आपले दलितोद्धाराचे कार्य अधिक जोमाने व नेटाने करतो. कादंबरीत श्यामसुंदरचा अतिशय करूणाजनक अंत दाखविला आहे. कोल्हटकरांची ही कादंबरी वास्तवापासून फार दूर असून स्वप्नसृष्टीच्या जवळ आहे, असे वाटत राहते.

कोल्हटकरांनी कवितेच्या प्रांतातही विहार केला आहे, पण त्यांना कवितारचनेची हौस एकंदर कमीच होती. सर्व प्रकारचे लेखन वाचताना कविता मात्र ते अचूक गाळीत. त्यांच्या मेव्हण्याने एकदा त्यांना आपल्या पित्याच्या निधनाची करुण कहाणी सांगितली. त्या कहाणीवरून कोल्हटकरांनी आपली पहिली कविता 'तो दिन' लिहिली. ती बरीच लोकप्रिय झाली. त्यामुळे त्या कवितेनंतर 'अनुपम सुख', 'खरी भाऊबीज', 'तुळशीचे लग्न', 'छत्रीचे उपकार', 'भयंकर जागृती' इ. कविता १८९८-९९ सालात प्रसिद्ध झाल्या, त्यानंतर १९००-१९०१ सालात त्यांच्या पाच कविता प्रसिद्ध झाल्या. एका मित्राने त्यांना 'तुमच्या कवितेचे रहस्य आपणास मुळीच कळले नाही' असे म्हटल्यावरून तेवढेच निमित्त साधून त्यांनी कवितालेखन करणे बंद केले.

त्याची काव्यरचना मुंबईच्या गोविंदाग्रज मंडळाने १९२२ च्या सप्टेंबरमध्ये प्रसिद्ध केलेल्या 'गीतोपायन' ह्या लहानशा संग्रहात प्रसिद्ध झाली आहे. त्यात एकूण १६ कविता आहेत. त्यात त्यांच्या इतर लेखनाप्रमाणेच भावना कमी आहेत. त्यातल्या त्यात 'छत्रीचे उपकार', 'ऐसा बाई ! पाऊस पाहिला नाही' व 'महाराष्ट्रगीत' ह्या कविता कल्पनारम्य आहेत. कोल्हटकर केव्हाही बाहेर जावयाला निघाले म्हणजे छत्री घेऊन बाहेर पडत असत. पाऊस किंवा ऊन असो किंवा नसो, दिवस असो किंवा रात्र असो, छत्री ही त्यांच्या हाती असायचीच. "लहानपणी तोंडाला झालेल्या लकव्याच्या विकारामुळे आपले वाकडे तोंड कुणाच्या दृष्टीस पडू नये म्हणून मी कायम आपले तोंड छत्री उघडून त्यात लपवीत असे" असे ते म्हणत. त्यांच्या ह्या भावना त्यांनी 'छत्रीचे उपकार' ह्या कवितेत व्यक्त केल्या आहेत. ह्यात त्यांनी छत्रीला माऊलीची उपमा दिली आहे. 'महाराष्ट्रगीत' या कवितेतून त्यांची उच्च कविप्रतिभा, कल्पकता आणि भावनेचा उद्रेक यांचा आढळ होतो. "बहु असोत सुंदर संपन्न की महा। प्रिय आमुचा एक महाराष्ट्र देश हा" ही या कवितेची ओळ अनेकांच्या ओठांवर अजूनही आहे. त्यामुळे कोल्हटकरांची कवितेच्या प्रांतातली कामगिरी ही संख्या व गुण या दोन्ही दृष्टींनी डोळ्यात भरण्यासारखी नाही हा जरी टीकाकारांचा अभिप्राय असला तरी तेवढ्याचमुळे ते कवीच नव्हते असे मात्र म्हणता येणार नाही.

कोल्हटकरांनी स्वतःच्या कथालेखनाच्या जन्माचा व पुढील प्रवासाचा वृत्तांत त्यांच्या 'आत्मवृत्ता'त दिला आहे. कथालेखन कितपत साधते हे पहाण्याचा त्यांचा ब-याच दिवसांपासून विचार होता. तो १९१० साली त्यांनी कृतीत उतरविला. 'गाणारे यंत्र' ही त्यांची पहिली गोष्ट होय. ह्याच्या निर्मितीची पार्श्वभूमी मूळातूनच वाचण्यासारखी आहे. ह्या पार्श्वभूमीचा शेवट करताना कोल्हटकर म्हणतात, "ती माझी पहिलीच गोष्ट असल्यामुळे वठावी तशी मुळीच वठली नाही." तिच्यापुढील गोष्ट 'पती हाच स्त्रीचा अलंकार' तिच्यापेक्षा बरीच सरस वठली. त्यानंतर 'संपादिका' (इ. स. १९११), 'गरीब बिचारे पाडस' (१९१२), 'वर्षाची तयारी' वगैरे कथा त्यांनी लिहिल्या. कवितेप्रमाणेच कथेच्याही क्षेत्रात त्यांची कामगिरी विशेष दखलपात्र नाही.

**ज्योतिर्गणितज्ज्ञ**

कोल्हटकरांचा हा एक दुर्मिळ असा विशेष आहे. कारण साहित्यासारख्या प्रांतात रमणा-या व्यक्तीला ज्योतिर्गणितासारख्या शास्त्रीय आणि अत्यंत क्लिष्ट प्रांतात रूची असण्याचा संभव कमीच. परंतु कोल्हटकरांची या विषयातील गती एवढी होती की, त्यांनी भारतीय ज्योतिर्गणित (१९१३) हा ग्रंथच लिहिला. कोल्हटकरांना विद्यार्थी दशेपासूनच ज्योतिषाचा फार नाद होता. 'ग्रहलाघवा'तील ग्रहसाधनाच्या रीतींची उपपत्ती काही केल्या लागेना म्हणून ते या विषयाच्या खोलात शिरले. तेव्हा त्यांच्या असे लक्षात आले की, त्या रीती पाश्चात्य रीतींशी जुळतात, म्हणून त्यांनी पाश्चात्त्य गणिताचा अभ्यास केला. त्यानंतर त्यांनी गॉडफ्रे, मेन, विल्किन्सन इत्यादी पाश्चात्त्य व वेंकटेश बापूजी केतकर, शंकर बाळकृष्ण दीक्षित यांसारख्या भारतीय विद्वानांचे ग्रंथ अभ्यासपूर्वक वाचले, एवढा सगळा अभ्यास झाल्यानंतर त्यांनी 'भारतीय ज्योतिर्गणित' हा चतुर्भागात्मक निबंध लिहिला. ह्यात प्राचीन भारतीय ज्योतिर्गणित अर्वाचीन पाश्चिमात्त्य गणिताच्या आधारे मांडून ते स्पष्ट, सुबोधपणे समजावून देण्याचे कार्य त्यांनी केले आहे. त्यांच्या या ग्रंथातील विद्वत्तेमुळे सांगलीच्या पंचांगसंमेलनाच्या अध्यक्षपदी (१९२०) लोकमान्य टिळकांनी त्यांना निवडले.

हा ग्रंथ लिहिताना कोल्हटकरांच्या बुद्धिवर किती विलक्षण ताण पडला होता हे त्यांच्याच शब्दांत पुढे देतो. 'आत्मवृत्ता'त म्हणतात, "निबंध प्रसिद्ध झाल्यावर मला डोक्यावरून एक मोठा बोझा खाली उतरल्यासारखे वाटले. त्या निबंधाकरिता मी कितीतरी परिश्रम केले होते! ...... एक-दोनदा तर मला डोक्यात सतत घोळत असलेल्या शंकांमुळे महिना-महिना निव्वळ जाग्रणे काढावी लागली होती. कितीदा तरी आपली प्रकृती बिघडवून घेतली होती. इतकी वर्षे समंधाप्रमाणे जडलेल्या विषयापासून मुक्त होताच मला हायसे वाटावे यात काही आश्चर्य नाही. मला पूर्णपणे स्वतंत्र झाल्यासारखे वाटू लागले व यापुढे ज्योतिष्याच्या वा-यालाही उभे रहावयाचे नाही असा मी निश्चय केला."

विद्वद्रत्न डॉ. भाऊजी दप्तरी हे त्याकाळात नागपुरात एक प्रकांड पंडित व बुद्धिवादी विद्वान होऊन गेले होते. 'ज्योतिर्गणित' ह्या विषयावर त्यांचा फार मोठा अधिकार होता. कोल्हटकर त्यांच्या बुद्धिवैभवाने दिपून गेले होते. गणितशास्त्रातील काही अडचणी ते दप्तरींना नेहमी विचारीत. 'भारतीय ज्योतिः शास्त्रनिरीक्षण' हा ग्रंथ दफ्तरींनी इ. स. १९२९ मध्ये लिहिला. ह्या ग्रंथाला कोल्हटकरांनी विस्तृत व विद्वत्तापूर्ण प्रस्तावना लिहिली आहे. कोल्हटकर व दप्तरी या दोघांचीही महती कळून येण्याकरिता या प्रस्तावनेची हकीकत थोडक्यात येथे देतो.

आपल्या ग्रंथास प्रस्तावना तात्यासाहेब कोल्हटकर यांची असावी, अशी दप्तरी यांची फार इच्छा होती. परंतु त्याला अडचणी होत्या. एकतर, श्री. तात्यासाहेब कोल्हटकर यांनी त्या वेळी कोणत्याही ग्रंथास आणि कसलीही प्रस्तावना लिहावयाची नाही, असा ठाम निश्चय केला होता आणि दुसरे, त्या वेळी श्री. तात्यासाहेब कोल्हटकर हे मोतीबिंदूमुळे पूर्ण आंधळे झाले होते. त्यामुळे त्यांना लिहिणे व वाचणे ही दोनही कामे करणे शक्य नव्हते. परंतु प्रस्तावना लिहिण्याबद्दल ज्या वेळी कोल्हटकरांना विनंती करण्यात आली त्या वेळी कोल्हटकर म्हणाले, "एकुलती एकच अशी हस्तलिखित प्रत दहा वर्षांपूर्वी ज्या वेळी मला दप्तरीसाहेबांनी मनाच्या विशालतेने आणि उदार अंतःकरणाने दिली, त्या वेळच्या प्रसंगाची आठवण झाली म्हणजे भडभडून येते. अशा थोर दप्तरीसाहेबांच्या ह्या ग्रंथाला प्रस्तावना लिहिण्याचे भाग्य मला लाभावे अशी माझीच फार इच्छा होती व ती आज पूर्ण होत आहे." अंधत्वामुळे कोल्हटकरांनी जळगावच्या आपल्या एका स्नेह्याकडून प्रस्तावना तोंडी सांगून लिहवून घेतली व पुस्तकाचे छापील फार्म व प्रुफे श्री. भाऊसाहेब माडखोलकर यांनी कोल्हटकरांच्या सुचनेप्रमाणे तपासली. ('युगवाणी', कोल्हटकर विशेषांक, जून १९७०, पृ. ८९, ९०)

**कोल्हटकरांचे साहित्यविशेष**

कल्पकता, सौंदर्यदृष्टी आणि तत्त्वप्रतिपादनाची तळमळ हे कोल्हटकरांच्या साहित्याची ठळक वैशिष्ट्ये होत. हे विशेष ते कधीकधी सूचकतेने तर कधी विनोदाच्या सहाय्याने व्यक्त करतात. आपला अपूर्व कल्पनाशक्ती, बुद्धिसामर्थ्य आणि स्वतंत्र विचार यांच्या सहाय्याने त्यांनी आपल्या काळात वाङ्मय क्षेत्रात खरोखरच स्वतंत्र संप्रदाय सुरू केला. माडखोलकर या अर्थाने त्यांना 'युगप्रवर्तक' म्हणतात. असे असूनही कोल्हटकरांच्या वाङ्मयावर बरीच प्रतिकूल टीका झाली. त्यांचे वाङ्मय त्यांच्या हयातीतच लोकांच्या वाचनातून गेले होते. कोल्हटकर थोर वाङ्मयकार होते यात संशयच नाही. मग त्यांच्या वाट्याला ही उपेक्षा का आली असावी?

याचा सूक्ष्मपणे विचार करता असे लक्षात येते की, आत्यंतिक बुद्धिप्राधान्य हे त्यांचे वाङ्मय लोकांच्या पसंतीस न उतरण्यामागे कारण असावे. बुद्धिप्रामाण्य हा निकष शास्त्रीय वाङ्मयात प्रधान असतो. परंतु कलेच्या क्षेत्रात तसे नसते. त्यात भावनेच्या सहाय्याने हृदयसंवाद साधायचा असतो. कोल्हटकरांनी तसे केले नाही. त्यांनी कलेच्या आत्म्याचा वेध घेण्याचा प्रयत्न केला नाही तर वाङ्मय-रचना-शास्त्राच्या नियमांनी वाङ्मयाच्या कौशल्ययुक्त गुंफणीला म्हणजे कारागिरीलाच अधिक महत्त्व दिले. बुद्धिप्रधानतेला अवास्तव महत्त्व दिल्यामुळेच त्यांची नाटके लोकप्रिय होऊ शकली नाहीत. तर भावनेच्या समरसतेमुळे खाडिलकर-गडकरी यांची नाटके त्यांच्यापेक्षा जास्त लोकप्रिय ठरली 'बुद्धिहीन मनुष्याचे सौंदर्य आजपर्यंत माझ्या मनास कधीही पटले नाही' असे ते स्पष्टपणे म्हणतातच. ('आत्मवृत्त', पृ. ५८)

आत्यंतिक बुद्धिनिष्ठा याप्रमाणेच क्लिष्टता अर्थात प्रसादाचा अभाव हेही एक कारण त्यांचे वाङ्मय लोकप्रिय न होण्यामागे आहे. त्याबद्दल ते 'वीरतनयाची ढाल' या आपल्या लेखात म्हणतात, "सुगमता ही काव्याचे फारच गौण अंग आहे. सुंदर विचार दुर्बोधतेशिवाय आणता येत नसतील, तर ते न येण्यापेक्षा सुगमता न आलेली पुरवली. शास्त्रीय विषय खेळकर पद्धतीने सोपा करून सांगितल्याने त्या विषयाचा खेळखंडोबा होऊन जातो, अशी त्यांची धारणा होती. (पहा, 'माझे लेखनगुरू' - ग. त्र्यं. माडखोलकर, पृ. २१)

कोल्हटकरांच्या अशा काही दोषांकडे व त्यांच्या काही टीकाकारांकडे दुर्लक्षच करावे लागेल. कारण साहित्याच्या क्षेत्रात सूक्ष्म बुद्धिमत्ता व अपूर्व कल्पनाशक्ति यांच्या सहाय्याने पुढच्या अनेक धुरंधर लेखकांना प्रेरक

होईल असे साहित्य व परंपरा त्यांनी निर्माण केली. उत्कृष्ट साहित्यिक तर अनेक निर्माण झाले. पण या उत्कृष्ट व थोर साहित्यिकांनी कोल्हटकरांना आपले गुरू म्हणवून घेण्यातच धन्यता मानली ही एकच गोष्ट कोल्हटकरांच्या वाङ्मयाची थोरवी पटवून देण्यास पुरेशी आहे. गडकरी, खांडेकर, वरेरकर, माडखोलकर यांसारख्या शिष्यांची उज्ज्वल परंपरा कोणा तरी साहित्यिकाची असेल का? गडक-यांबद्दल असे सांगतात की, काही कारणामुळे त्यांना वैराग्य उत्पन्न होऊन ते वेडे होण्याच्या मार्गावर लागले होते. परंतु कोल्हटकरांच्या लिखाणाने त्यांच्या मनाला खाद्य पुरवून ते वेड लागण्यापासून बचावले होते. ('आत्मवृत्त', पृ. ५९) त्यांनी आपले प्रेमसंन्यास नाटक कोल्हटकरांना अर्पण केले आहे. कोल्हटकर आपल्या पायांना कुणालाही स्पर्श करू देत नसत, कारण त्यांच्या पायांना इसब होता. पण गडक-यांची कोल्हटकरांवर इतकी भक्ती होती की, कोल्हटकरांच्या पायांना इसब असतानासुद्धा त्यांच्या पायावर डोके ठेवीत आणि म्हणत, 'तात्या, तुमच्या स्पर्शाने जर मला इसब झाला, तर तो सुद्धा मी तुमचा कृपाप्रसादच समजेन.' वा. म. जोशी म्हणत, 'कोल्हटकरांच्या ललित वाङ्मयात कालिदासाची कल्पकता आणि भवभूतीचा भावाविष्कार एकवटलेला आहे.' तर त्यांच्या गंभीर वाङ्मयाबद्दल विद्वद्रत्न भाऊजी दप्तरी म्हणत, 'त्यांच्या गंभीर वाङ्मयात बुद्धीची तीक्ष्णता आणि व्यासंगाची सूक्ष्मता एकवटली आहे.' ही उदाहरणे दिल्यानंतर त्यांच्या वाङ्मयाची आणखी निराळी महती सांगण्याची आवश्यकता आहे का?

**कोल्हटकरांचे 'आत्मवृत्त'**

कोल्हटकरांनी आपले आत्मवृत्त प्रो. मायदेव यांच्या विनंतीनुसार ऑगस्ट १९१८ ते मार्च १९१९ या कालावधीत लिहिले व ते पुढे त्यांच्या मृत्यूनंतर १९३५ साली आधी 'प्रतिभे'त क्रमशः व नंतर पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाले. हे आत्मवृत्त या ना त्या कारणांनी विनाकारण गाजले. ह्याची काहीशी हकीकत श्री. माडखोलकर यांनी 'कोल्हटकर आणि हिराबाई' या म. ल. व-हाडपांडे लिखित पुस्तकाला लिहिलेल्या प्रस्तावनेत आढळते. या 'आत्मवृत्ता'त विशेष असे काहीच नाही. १९२० पर्यंतच्या कोल्हटकरांच्या आयुष्याचा समग्र आणि सुसंगत इतिहास लिहिला. म्हटले तर तो देखील आपल्या हाती लागत नाही. कोल्हटकर आणि त्यांच्या सहवासात आलेल्या व्यक्ती यांच्या संबंधांवर थोडाबहुत प्रकाश आणि कोल्हटकरांनी लिहिलेल्या नाटकांच्या निर्माणाचा आणि ती नाटके रंगभूमीवर आणण्याच्या मुद्यांवरून झालेल्या भानगडी यांनीच या आत्मवृत्ताचा बहुतांश भाग व्यापला आहे. मात्र त्या पुस्तकांची भाषा विलक्षण घोटीव आहे. पाल्हाळ अजिबात नाही. लिखाणाच्या शुद्धतेविषयीचा आणि रेखीवपणाचा त्यांचा कटाक्ष त्यांच्या या 'आत्मवृत्तांत'ही पहावयास मिळतो.

कोल्हटकरांचे मूळ वसतिस्थान कोकणातील नेवरे गाव होय. त्यांचे वडील कृष्णराव यांची नोकरीची हयात व-हाडात गेली. १८९७ च्या अखेरीस त्यांचे देहावसान झाले. कृष्णरावांना दोन बायका होत्या, दोघींचेही नाव सावित्रीबाई असे होते. कोल्हटकरांचा जन्म दि. २९/६/१८७१ रोजी नागपूरला झाला. कोल्हटकर नऊ वर्षांचे असताना त्यांना अर्धांगवायूचा विकार होऊन त्यांची मान व जीभ वाकडी झाली. थोड्याच दिवसात आपले सर्वांग वाकडे झाले याची जाणीव होऊन त्यांच्यात न्यूनगंड निर्माण झाला व त्यांच्या बेडौल शरीराबद्दल व बेढब चालण्याबद्दल त्यांचा इतरांकडून उपहास होऊ लागला. आपले शरीर जरी बेढब असले तरी ती उणीव लेखनात प्रावीण्य मिळवून ते व्यंग झाकून टाकता येईल असे वाटून त्यांनी लिखाण वाचनाकडे अधिकाधिक लक्ष पुरविण्याचे ठरविले.

वयाच्या १५ व्या वर्षी कोल्हटकरांचा विवाह खामगाव येथील वकील श्री. वामनराव जोशी यांच्या कन्येशी झाला. त्यांचे नाव राधाबाई असून लग्नसमयी त्या सात वर्षांच्या होत्या. १८८९ च्या आरंभी कोल्हटकरांनी पुण्याच्या डेक्कन कॉलेजमध्ये प्रवेश केला. त्याच वर्षाच्या अखेरीस त्यांच्या पायांना इसबाचा विकार सुरू झाला. विद्यार्थीदशेतच ते आपल्या हुशारीने उठून दिसत होते. त्यांच्या लिखाणाला तेव्हाच सुरुवात झाली होती. इ. स. १८९१ मध्ये ते बी. ए. झाले. महादेवशास्त्री, भाऊराव, अच्युतराव आणि चिंतामणराव ही सर्व गाजलेली कोल्हटकर मंडळी त्यांच्या निकट आप्तवर्गातली होती.

इ. स. १८९७ मध्ये ते वकील होऊन त्यांनी वकिली सुरू केली. १९०५ पर्यंत त्यांनी तेल्हा-यास वकिली केली. तेल्हा-याचं कोर्ट १९०५ साली बंद झाल्यावर १९१८ पर्यंत ते खामगावी वकिली करीत होते. याच काळात त्यांच्या साहित्यिक दृष्टीचा आणि जीवनाचा सर्वांगीण विकास झाला. तेल्हारा येथे असतानाच त्यांनी फौजदारी कामे घेण्याचे सोडले, ते अखेरपर्यंत. १९१८ साली ते जळगावला आले व तेथे वकिली सुरू केली केली. १९३०-३१ मध्ये ते जळगांव सोडून खामगावला गेले.

इ. स. १९२७ मध्ये पुणे येथे झालेल्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे ते अध्यक्ष होते तर इ. स. १९२३ साली 'विदर्भ साहित्य संमेलना'चे ते पहिलेच अध्यक्ष होते.

**कोल्हटकर आणि हिराबाई पेडणेकर**

कोल्हटकर आणि हिराबाई पेडणेकर यांच्या संबंधाबद्दल लिहिल्याशिवाय कोल्हटकरांवरच्या लिखाणाला पूर्तता यावयाची नाही, इतकी ही स्त्री कोल्हटकरांच्या जीवनात व साहित्यप्रवासात महत्त्वाची आहे. कोल्हटकरांनी तिच्याबद्दल 'माझ्या आयुष्यावर ज्या काही व्यक्तींचा चिरस्थायी परिणाम झालेला आहे त्यांपैकी एक – असे लिहिले आहे. ('आत्मवृत्त', पृ. ५४). या दोघांच्या संबंधाबद्दल अनेक लिखाण झाले आहे. प्रा. म. ल. व-हाडपांडे यांनी तर 'कोल्हटकर आणि हिराबाई' हा ग्रंथच लिहिला असून त्याला माडखोलकरांनी अतिशय विस्तृत आणि सुंदर प्रस्तावना लिहिली आहे. प्रामुख्याने हा ग्रंथ व 'आत्मवृत्त' यांच्या आधारे हिराबाई व त्यांच्या आणि कोल्हटकरांच्या संबंधाबद्दल पुढे थोडक्यात माहिती देतो.

हिराबाईंचा जन्म ता. २२ नोव्हेंबर १८८५ रोजी सावंतवाडी येथे झाला. त्यांचे मूळ गाव 'पेडणे' होते. त्यांना तीन मावश्या असून आई शेवंतुबाई सावंतवाडीस नायकीणीचा व्यवसाय करीत. या कुटुंबाची जात 'कलावंत' होती. संगीत, नृत्य, नाट्य वगैरे कलांची पिढीजात उपासना या वर्गात असते. गोविंद बल्लाळ देवल यांचे मधले बंधू रामभाऊ यांनी बहुतेक हिराबाईच्या आईला ठेवले होते. त्या संबंधातून हिराबाईंचा जन्म झाला असावा असा एक तर्क आहे. ('कोल्हटकर आणि हिराबाई', पृ. २३)

हिराबाई ८-९ वर्षांच्या असताना त्यांच्या मातुश्रींचे निधन झाले. त्यानंतर त्या मुंबईला भीमाबाई ह्या आपल्या मावशीकडे गेल्या. हीनकुलात जन्म झाला याबद्दल हिराबाईंना विलक्षण खंत वाटत होती. कुलीन स्त्रीप्रमाणे विवाह करून आदर्श संसार करायचा अशी ज्यांची फार इच्छा होती. त्यादृष्टीने त्यांनी प्रयत्नही केले होते. वेश्यावृत्तीच्या ती विरुद्ध होती. गाणे करून ती पैसे मिळवी.

हिराबाईंना साहित्याची उत्तम जाण होती. संत-साहित्याचा त्यांचा व्यासंग होता. या व्यासंगामुळे त्यांचे व्यक्तिमत्त्व समृद्ध व सुसंस्कृत झाले होते. त्यांनी इ. स. १९०४ मध्ये 'जयद्रथविडंबन', १९०७-०८ मध्ये 'दामिनी' आणि 'संगीत मीराबाई' अशी तीन नाटके लिहिली होती. १९०१-०२ च्या सुमारास मराठी रंगभूमीवरील पहिले धैर्यधर श्री. नानासाहेब जोगळेकर यांचा हिराबाईंशी परिचय झाला. हिराबाई प्रथम दर्शनीच जोगळेकरांच्या प्रेमात पडल्या. जोगळेकरांनी हिराबाईस 'ठेवले' होते. १५ नोव्हेंबर १९११ रोजी जोगळेकरांचा मृत्यू झाला. हिराबाईंना त्यांच्या मृत्यूचा धक्का असहनीय होऊन त्यांनी दारूला जवळ केले. पुढे १९१७ च्या दरम्यान हिराबाईंचा श्री. कृष्णाजी नेने यांच्याशी परिचय झाला. पुढील आयुष्यात त्या नेन्यांबरोबर पत्नीप्रमाणे राहिल्या. दि. १८ ऑक्टोबर १९५१ रोजी कॅन्सरच्या आजाराने त्या दिवंगत झाल्या.

कोल्हटकरांचा हिराबाईंशी संबंध १९०१ साली आला. भास्करबुवा बखले यांना काही गायनपटू शिष्यिणींचे गाणे ऐकवण्याच्या कोल्हटकरांनी केलेल्या विनंतीवरून त्यांना हिराबाईंकडे नेण्यात आले. हिराबाईंना पाहाताच तिच्या सौजन्ययुक्त वागणुकीने व मोहक सौंदर्याने कोल्हटकरांवर अपूर्व मोहिनी घातली व ते तिच्याकडे आकर्षिले गेले. हिराबाईंच्या व्यक्तिमत्त्वाने कोल्हटकर पूर्णपणे भारावून गेले होते. हिराबाईंचा परिचय झाल्यानंतरच्या नाटकात व अगोदरच्या नाटकांच्या नायिकेत विलक्षण फरक दिसतो तो हिराबाईंशी झालेल्या ओळखीमुळेच.

हिराबाईही कोल्हटकरांकडे आकर्षिल्या गेल्या होत्या.

मात्र दोघांच्याही आकर्षणाचे कारण वेगवेगळे होते. कोल्हटकर तिच्याबद्दल मदनविद्ध झाले होते तर हिराबाईंना त्यांच्याविषयी जे आकर्षण होते ते मात्र सर्वथैव त्यांच्या साहित्यगुणांचे. जोगळेकरांनी हिराबाईंना आश्रय दिला हे माहित असूनसुद्धा कोल्हटकर त्यांच्या एकतर्फी प्रेमपाशात जास्त गुरफटत गेले. जोगळेकरांना कोल्हटकरांच्या आणि हिराबाईंच्या संबंधाबद्दलची कल्पना होती तरी जोगळेकर त्यांना योग्य मान देत तर कोल्हटकर जोगळेकरांचा मत्सर करीत. १९११ मध्ये जोगळेकरांचे निधन झाल्यानंतर कोल्हटकरांच्या स्नेहाला मुक्तद्वार मिळाले. कोल्हटकरांनी हिराबाईला आश्रय दिला व काही काळ स्वग्रामी नेऊन ठेवले. १९१४ पर्यंत दोघांचे संबंध कायम होते. त्यानंतर त्यांच्या संबंधांना ओहोटी लागली. १९१७ पर्यंत ते वरवरचे व जुजबी राहून त्यानंतर ते कायमचे संपले. हिराबाईंनी आपण होऊन कोल्हटकरांचा संबंध तोडला.

हिराबाईंच्या आणि कोल्हटकरांच्या संबंधाबद्दल ही थोडक्यात हकीकत आहे. यांच्या संबंधांबद्दल बरीच पत्रे, बरीच माहिती प्रकाशित झाली आहे. परंतु त्यांच्या संबंधातील मर्म एकाही ठिकाणी स्पष्टपणे लिहिलेले आढळत नाही. खरी गोष्ट अशी असावी की हिराबाईंना आपल्या आयुष्याच्या सुरक्षेकरिता एखाद्या गृहस्थाची कायम आवश्यकता असावी व त्यादृष्टीने त्यांनी कोल्हटकरांकडे पाहिले असावे. पण कोल्हटकरांनी आपल्या सामाजिक प्रतिष्ठेपायी हिराबाईंना स्वीकारले नसावे. हिराबाईंना आपले 'दामिनी' नाटक कोल्हटकरांना अर्पण करण्याची इच्छा होती. पण कोल्हटकरांनी प्रतिष्ठेपायी या नाटकाची अर्पणपत्रिका स्वीकारली नाही. या संदर्भात आचार्य अत्रेंनी माडखोलकरांजवळ व्यक्त केलेला अत्यंत मार्मिक आणि बोलका अभिप्राय विस्ताराचा धोका पत्करूनही याठिकाणी देतो. अत्रे म्हणतात, "......कोल्हटकरांचा हिराबाईंशी कोणत्या प्रकारचा संबंध होता, याबद्दल आपण अनेकदा बोललेले आहोत. पण ते लोकांना सांगण्याची काय गरज आहे? सर्वसामान्य माणसांना असल्या गोष्टींची कारणे कळत नाहीत, अर्थ कळत नाही आणि मर्म तर मुळीच उमजत नाही. हे सगळे त्यांच्या बुद्धीच्या आटोक्यापलीकडले असते, कलाकारांचे दुर्गुण, दुर्व्यसने आणि दुराचरण ही पुष्कळदा त्यांच्य कलाविकासाला पोषक होतात, हे कळण्याची अक्कलच मुळी सामान्य माणसांना नसते. कलाकारांचे - बहुतेक सर्वच अलौकिक व्यक्तींचे जीवन अलौकिक असते आणि पुष्कळदा अनैतिकही असते. लोकमान्य टिळकांसारखा अपवाद एकादाच. तुम्हाला तरी निदान मी हे सांगायला नको. कोल्हटकर फार संभावित आणि शहाणे होते. ते असल्या गोष्टींविषयी सहसा कधी बोलत नसत. लिहीत तर मुळीच नसत. ('युगवाणी' कोल्हटकर विशेषांक, जून १९७०, पृ. १०२)

**उपसंहार**

कोल्हटकरांना ईश्वराने अलौकिक प्रतिभेचा वर दिलेला असला तरी त्याचबरोबर शारीरिक व्यंगाचा मोठा शापही दिला होता. त्यांना वयाच्या ९ व्या आणि १४ व्या वर्षी अर्धांगवायूचे दोन झटके येऊन त्यांचे शरीर काहीसे बेडौल झाले होते. त्याच्या जोडीस १८८९ साली त्यांच्या पायांना इसबाचा विकार सुरू झाला. त्या विकाराने शेवटपर्यंत त्यांचा पिच्छा पुरविला. माडखोलकरांनी 'कोल्हटकरांचे शापित जीवन' ह्या नावाचा एक लेख लिहून त्यांना ह्या विकारापासून होणारा त्रास विस्तृततेने रंगविला आहे. त्यात एके ठिकाणी ते लिहितात, "कोल्हटकर एकदा वैतागाने मला म्हणाले, 'हा ऋतू म्हणजे हाडवैरी आहे माझा! मला इसबाचा इतका त्रास हिवाळ्यात होतो की, त्यामुळे या रोगापायी किळसवाणे आणि लाजिरवाणे होऊन गेलेले आपले हे शरीर, घासलेट तेल अंगावर ओतून, आपल्या हातांनी जाळून टाकावे, असे मला केव्हा केव्हा वाटते! बाळपणापासून तोंडाला आलेले लकव्याचे झटके आणि अंगभर पसरलेला हा इसब यांच्यामुळे हे शरीर अगदी नकोसे होऊन गेलेले आहे मला!"

म्हणून, त्यांचे स्नेही श्री. काकासाहेब जोशी यांनी त्यांच्या मृत्यूविषयी लिहिताना असे उद्गार काढलेले आहेत की, "दिनांक १ जून १९३४ ला सकाळी ६ वाजता तात्यासाहेबांचा आत्मा नश्वर देह सोडून पंचत्वात विलीन झाला. त्यावेळी त्यांच्या आत्म्याने त्या जन्मभर व्याधिग्रस्त असलेल्या जर्जर देहाकडे पाहून हसत हसत निश्चितपणे म्हटले असेल. "सुटलो बाबा, एकदाचा तुझ्या तडाक्यातून!'

❖❖❖

# समकालीन चर्चापद्धती व त्यांतील काही दोष

संतोष शेलार

सोशल मिडीयाचा वापर क्रमाने वाढत आहे. त्याचा वापर केवळ मनोरंजनापुरता मर्यादित राहिलेला नसून आता तिथे गंभीर चर्चासुद्धा चालतात. सध्या सोशल मिडीयात ज्या चर्चा चालतात, त्या चर्चेच्या पद्धतीविषयी मला काही आक्षेप नोंदवायचे आहेत.

हा लेख लिहिताना माझ्या डोळ्यासमोर मुख्यतः समकालीन व ऐतिहासिक प्रश्नांवर चालणा-या चर्चा अभिप्रेत आहेत. सोशल मिडीया म्हणतांना मी वॉटस ॲप, फेसबुक आणि ब्लॉग यावर चालणा-या चर्चा गृहीत धरलेल्या आहेत. या माध्यमातून चालणा-या चर्चांची खोली क्रमाने वाढत आहे. विशेषतः फेसबुक आणि ब्लॉग या माध्यमांची. उदाहरणच द्यायचे झाले तर असे देता येईल की, समजा शिवकालावर काही चर्चा सुरू आहे. तर मंडळी केवळ इतिहासकारांचे संदर्भ देऊन थांबत नाहीत, तर कोणत्या मूळ साधनात (Source) काय म्हटले आहे याचे संदर्भ ते देतील. जेधे शकावली अधिक विश्वसनीय आहे की शिवभारत यावर हिरीरीने चर्चा करतील. अमुक एक पत्र आता कसे बनावट ठरले आहे, हे कुणीतरी सांगेल तर ते अस्सल असल्याचे कुणी तरी पटवून देण्याचा प्रयत्न करील. अर्थात सर्वच मंडळी या पातळीवरून बोलतात असे नाही. सोशल मिडीयावर सर्व प्रकारचे लोक असतात. सोशल मिडीयाचा आणखीन एक विशेष असा की तिथे सर्वांना समान संधी असते. अभ्यास नाही अथवा कमी आहे म्हणून त्याने चर्चेत भाग घेऊ नये, असा काही नियम नाही. एखादा मोठा विचारवंत असो की, सामान्य माणूस. संधी समानच!

पहिला मुद्दा भाषेचा. बरीच मंडळी नीट मराठी लिहित नाहीत, असे मला वाटते. मी हे टायपिंगमध्ये होणा-या चुकांविषयी बोलत नाही. तसेच पहिली वेलांटी की दुसरी अशा चुकांविषयीही बोलत नाही. (प्रस्तुत लेखकाचेही शुद्धलेखन वाईटच आहे.) तसेच भाषा ग्रामीण की शहरी याविषयीसुद्धा मला काही म्हणायचे नाही. ब-याच वेळी वाक्याची रचनाच सदोष असते. शब्दांच्या वापराविषयी कित्येक वेळा असे लक्षात येते की, 'तो' विशिष्ट शब्द वापरताना त्याच्या अर्थाच्या विविध 'छटा' लक्षात घेतल्या जात नाहीत. एखादा मराठी शब्द अथवा त्याच्या विविध छटा नीट न समजल्यास मराठी शब्दकोश उघडून पाहणं अथवा एखाद्या अधिकारी व्यक्तीकडून तो समजावून घेणं हा नित्य साधनेचा भाग असला पाहिजे. कारण भाषाच कच्ची राहिली तर कोणत्याही विषयाच्या अभ्यासाचा प्रारंभ होणेसुद्धा अशक्य आहे.

आणखी एक आक्षेपार्ह गोष्ट म्हणजे मोठे मोठे शब्द वापरण्याचा हव्यास. उदा., गाढे अभ्यासक, दिग्गज हे शब्द कित्येक वेळा गरज नसताना वापरले जातात. खरं तर ब-याचदा त्याची काहीच गरज नसते. साध्या, सरळ नि सोप्या शब्दांनी काम भागण्यासारखे असते.

अजून एक शंका मला अशी येते की, कित्येक मंडळींचं लिखाण केवळ चुकीच्या अथवा भ्रष्ट अनुवादामुळे दुर्बोध झालेले असते. (किती तरी वेळा आपण मराठीतून इंग्लिश तर वाचत नाही आहोत ना, अशी शंका येत राहते.) मोठमोठ्या संकल्पना नि थिअरींचा हव्यास सोडला तर ते लिखाण कदाचित काही प्रमाणात सुलभ नि सुसह्य होऊ शकले असते, असे वाटत राहते.

लिहिण्याच्या पद्धतीचा एक गंमतीदार भाग असा की, बरीच मंडळी एका परिच्छेदात खूप सारे मुद्दे कोंबतात. त्यातून होतं काय की, कोणत्याच मुद्द्याला न्याय मिळत नाही. त्या भाष्यातून विविध मुद्द्यांविषयी तुमची 'मतं' कळतात, पण मुद्दे 'सिद्ध' मात्र होत नाहीत. उदा., असहिष्णुतेविषयी काही सांगायचे असेल तर अगदी

चार्वाकांपासून ते नरेंद्र दाभोलकरांपर्यंत पंधरा-वीस उदाहरणे एकाच परिच्छेदात दिली जातात. त्यातली सर्वच उदाहरणे सर्वांना पटण्यासारखी असतात, असेही नाही. त्यापेक्षा कमी मुद्द्यांवर तपशीलात लिहिणे अधिक चांगले. अर्थातच मुद्दा पुरेशा पुराव्याने नि तर्कसंगत युक्तिवादाने 'सिद्ध' करणं अधिक महत्त्वाचं!

सोशल मिडीयावर आढळणारा अजून एक दोषास्पद प्रकार म्हणजे 'कॉन्स्पिरसी थिअरी'ची लागण. वर दिलेले असहिष्णुतेचेच उदाहरण घेऊ. एकाच परिच्छेदात पंधरा-वीस उदाहरणे दिली जातात. त्यात चार्वाक, संत ज्ञानेश्वर, संत तुकाराम, छ. शिवाजी, संभाजी राजे ते नरेंद्र दाभोलकर इ. विविध कालखंडातील बरीच नावे असतात व या सर्वांची सरसकटपणे हत्या झाल्याचे सांगितले जाते. त्यावरून पुरोगामी विचारवंतांची हत्या करण्याची परंपरा आपल्याकडे कशी पूर्वापार आहे, हे ठासून सांगितले जाते. हे एक प्रकारचे सामान्यीकरण असते. यात काही उदाहरणे खरी, काही वादग्रस्त तर काही चक्क खोटी असतात.

कित्येकदा एखादी साधी गोष्ट सांगताना त्यात भरपूर पारिभाषिक संकल्पना नि कित्येक भिन्न भिन्न विचारव्यूह यांचा मारा केला जातो. यातून दोन चुका घडतात. एक तर त्या संकल्पना व विचारव्यूह पुरेशा काटेकोरपणे वापरलेले नसतात. दुसरा मुद्दा म्हणजे त्या सर्व संकल्पना नि थिअरींच्या गोंधळात तपशील हरवलेला असतो. अगोदर एखादा तपशील वाचकांपर्यंत नीट पोचवून नंतर त्यावर भाष्य करावे, असे केले जात नाही. त्यामुळे भाष्य तर वाचकांपर्यंत पोचते; पण ज्या तपशीलांवर ते उभे आहे तो तपशील मात्र पोचत नाही. याला एक कारण कदाचित असं असू शकेल की, सध्या अन्वयार्थाच्या तुलनेत तपशीलाचे इतके अवमूल्यन झाले आहे की, तो नीट सांगण्याची गरजच फारशी कोणाला वाटत नाही. कधी कधी तर अशीही शंका येते की 'हे' सर्व आम्हाला 'अवगत' आहे, असं दाखवायचं आहे की काय?

अजून एक दोष म्हणजे अमुक एका विचाराची योग्ययोग्यता त्या विचाराची चिकित्सा करून न ठरवता तो कुठून आला आहे, कुणी मांडला आहे इ. मुद्द्यांवरून ठरविणे. जणु काही त्या विचारावर त्या त्या भागाचा, व्यक्तीचा किंवा संघटनेचा शिक्का मारलेला आहे!

काही लोकांस हेत्वारोपाची घाई झालेली असते. फार लवकर मंडळी समोरच्यावर हेत्वारोप करून रिकामी होतात. त्यातून समोरच्याचे म्हणणे सहानुभूतिपूर्वक समजूनच घेतले जात नाही. याच्या पुढची अवस्था म्हणजे एखाद्याला कुणाचा तरी 'हस्तक' म्हणून हिणवणे. या गोष्टींमुळे झालय काय की, मंडळी विशिष्ट मुद्द्यांविषयी प्रश्न विचारायला अथवा मतभेद व्यक्त करायला पण घाबरू लागली आहेत. उदा., काही गोष्टींबाबत प्रश्न विचारले अथवा मतभेद व्यक्त केले, तर लोक आपल्याला ब्राह्मणी किंवा हिंदुत्ववादी म्हणतील की काय, याचे टेन्शन असते. परिणामी खुलेपणाने चर्चा न होता साचेबद्ध चक्रातच मुद्दे फिरत राहतात आणि मग कित्येक मुद्दे 'आवाजी' बहुमताने संमत होतात.

हेत्वारोपाचाच पुढील विस्तार म्हणजे 'अनुक्त हेत्वारोप' होय. ('अनुक्त हेत्वारोप' हा शब्द श्री. राजीव साने यांनी घडविला आहे.) म्हणजे असे की एखाद्याने जे लिहिले अथवा बोलले आहे, त्यावर लक्ष केंद्रित न करता त्याने न लिहिलेल्या अथवा न बोललेल्या मुद्द्यांवर लक्ष केंद्रित करून हेत्वारोप करणे. यासाठी एकावर एक अशी अनुमानांची चवडच रचली जाते. इथे हे लक्षात घ्यायला हवे की बोलल्या गेलेल्या गोष्टी नेहमी सान्त असतात; तर न बोलल्या गेलेल्या गोष्टी अनंत असू शकतात. त्यामुळे 'हा' मुद्दा बोलला गेला तर 'तो' का नाही बोलला गेला, या म्हणण्याला फारसा अर्थ नसतो. काही जण तर अनुमानाच्या हनुमान उड्या मारत याच्याही पुढे जातात; नि न बोललेल्या मुद्द्यांविषयी सदर व्यक्तीचे मत कसे 'चुकीच्या' दिशेनेच जाणारे असू शकते, हे छातीठोकपणे सांगू लागतात.

आता तत्त्वतः हे मान्य करावे लागेल की, अमुक लेखकाने तमुक मुद्दा जाणिवपूर्वक गाळला, अशी स्थिती असू शकते. पण मग तिथे आपल्याला अमुक लेखनात तमुक मुद्दा येणे कसे 'अनिवार्य' होते हे 'सिद्ध' करून दाखवावे लागेल. अडचण हीच आहे की, आरोप खूप जण करतात, पण तो 'सिद्ध' करण्याची जबाबदारी मात्र अपवादानेच कुणी तरी स्वीकारते.

व्यत्यास खरा मानणे हा सुद्धा दोष आपल्याला इथे

पाहावयास मिळतो. उदा., समजा परंपरेचे अनुसरण करणारी एक विचारधारा आहे. तिला आपण प्रतिगामी विचारधारा म्हणू या. या विचारधारांवर टीका करणा-या, त्याची चिकित्सा करणा-या ज्या विचारधारा असतात त्यास पुरोगामी विचारधारा म्हणण्यात येते. पण चर्चेत ब-याचदा घडते काय की एखादा पुरोगामी विचारधारेची चिकित्सा करू लागला की, काही लोक त्यास प्रतिगामी ठरवून मोकळे होतात. इथे एक सोपे सूत्र वापरले जाते. ते म्हणजे प्रतिगामी विचारधारेची चिकित्सा करणारा तो पुरोगामी आणि पुरोगाम्यांची चिकित्सा करणारा तो प्रतिगामी! खरं म्हणजे पुरोगामी विचारांची चिकित्सा करणारा प्रतिगामी असेलच असे नाही. निदान तसे ठरायला नको. व्यत्यास खरा मानण्यात वैचारिक घोटाळा हा असतो की, तिथे दोनच पर्याय उपलब्ध आहेत, असे गृहीत धरले जाते की; जे खरे नाही. त्यामुळे व्यत्यास नेहमीच खरा असेल असे नाही.

कित्येकांना अभाववाचक विधाने करण्याची सवय असते. उदा., "गांधीजींनी अमुक एक विचार कधीच मांडला नाही." आता इथे हे लक्षात घेणे आवश्यक आहे की, 'गांधीजींनी अमुक एक विचार मांडला' असे विधान करणे फार सोपे आहे. कारण त्यासाठी गांधीजींचा एखादा लेख, भाषण किंवा चरित्र वाचणे पुरेसे आहे. पण अमुक विचार कधी मांडला नाही, असे विधान करण्यासाठी मात्र प्रचंड अभ्यास करावा लागेल. अशा प्रकारचं विधान करण्यासाठी त्यांचं समग्र वाङ्मय, चरित्रं, आठवणी इ. सर्वच गोष्टी वाचाव्या लागतील. एखादा अधिकारी अभ्यासकच असे विधान करू शकेल.

काही फेसबुकीय विद्वानांना सारभूत विधानं करण्याची सवय असते. ते कित्येकदा फार मोठ्या कालखंडावर एका वाक्यात भाष्य करतात. उदा., 'अहिंसावादामुळे गेली दोन हजार वर्षे भारताचे नुकसान होत आहे.' खरं तर असे विधान करण्यासाठी फारच अभ्यास करावा लागेल. अशी फार मोठ्या कालखंडावर पकड असणारे इतिहासकार पण अपवादानेच आढळतात. आर. सी. मजुमदार हे एक असे विरळा इतिहासकार होते. अर्थात मजुमदारांइतका अभ्यास करा आणि मगच बोला असे इथे सुचवायचे नाही. पण अशी विधानं करताना आपल्याला आपल्या मर्यादांची जाणीव हवी. असे विधान करताना दोन हजार वर्षांच्या इतिहासाचा 'किमान' तपशील आपल्याला माहिती हवा. या कालखंडावर इतिहासकारांनी लिहिलेले महत्त्वाचे ग्रंथ वाचलेले असले पाहिजेत. एवढ्या मोठ्या कालखंडावरील अस्सल साधने अभ्यासणे फारच अवघड आहे. तेव्हा अशी विधानं केलीच, तर अतिशय जपून आणि नम्रपणे करायला हवीत.

आता आणखी एका महत्त्वाच्या वाद-दोषाकडे वळू या. तो म्हणजे अखंडनीय विधाने करणे. कार्ल पॉपर यांनी 'शास्त्रीय' विधानाची कसोटी सांगितली आहे. त्यांच्या मते एखादे विधान खंडनीय असेल व अद्याप खंडित झालेले नसेल, तर ते विधान शास्त्रीय होय. म्हणजे विधान कोणकोणत्या प्रकारे खंडित केले जाऊ शकेल, याचा निकष विधान करणा-याला पुरवता आला पाहिजे. उदा., समजा मी एखाद्या इतिहासातील घटनेविषयी तपशीलवजा विधान केले. तर ते विधान कोणत्या तरी पुराव्यावर आधारित असते. (निदान असायला हवे.) मग ते विधान खोटे कधी ठरेल तर जेंव्हा एखादा नवा अधिक विश्वासार्ह पुरावा समोर आला तर किंवा जुना पुरावाच बनावट आहे, असे कुणी सिद्ध केले तर. अशा प्रकारे विधान खंडित होऊ शकणारे निकष पुरवणं ही विधान करणा-याची जबाबदारी आहे. ब-याचदा विशेषतः 'थिअरी'वाली मंडळी अशी विधानं करतात की, त्याविरुद्ध कितीही पुरावा दिला तरी ती खंडित होत नाहीत.जणू काही 'थिअरी' ही गोष्ट अपौरुषेय असते. अर्थातच अशी विधानं अशास्त्रीय असतात.

आता एक शेवटचा दोष. कित्येक मंडळी विधानं करत असताना ती अनाठायी आक्रमकपणे करत असतात. मला वाटतं आपल्याला हे भान असणं आवश्यक आहे की, जे विधान आपण करत आहोत ते नेमके कशावर आधारलेले आहे. एखादा विषय असा असू शकेल की, त्या विषयातील मूलभूत ग्रंथ आपण वाचलेले असू शकतील. त्याचे मूळ पुरावे आपल्याला माहिती असतील. त्याविषयी केली गेलेली चर्चा, विविध दृष्टिकोन आपल्याला अवगत असतील. मूळ पुराव्यांची ग्राह्याग्राह्यता, वेगवेगळ्या दृष्टिकोनांची योग्यायोग्यता आपण चिकित्सक मूल्यमापन करून ठरविलेली असेल व त्यावरून स्वतःचे काही

मतही बनविलेले असेल. पण असे किती विषयांबाबत (खरं म्हणजे मुद्द्यांबाबत) असू शकेल? असलाच तर एखादा! एखादा विषय असाही असेल की त्याविषयी चार बुकं आपण वाचलेली असतात. त्यातही ते ग्रंथ जर अधिकारी व्यक्तींनी लिहिलेले असतील, तर आपल्याला त्या विषयाची ब-यापैकी ओळख होऊ शकते. असेही काही बोटावर मोजण्याइतके विषय असू शकतात. पण जगात असे अनेक मुद्दे असतात की, त्याची आपल्याला जुजबी माहिती असते. पण बहुतांश मंडळी जगातील यच्चयावत विषयांवर सारख्याच अधिकार वाणीने भाष्य करीत असतात. निदान ज्या विषयात आपल्याला कमी माहिती आहे त्या विषयांवर मत व्यक्त करताना ते फाजील आक्रमक तर होत नाही ना, याची काळजी घ्यायला हवी. ती विधानं अधिक काळजीपूर्वक, नम्र भाषेत नि सावधपणे करायला हवीत. अनाठायी आक्रमकपणा काय कामाचा?

हे मला दिसलेले काही महत्त्वाचे दोष आहेत. या क्षेत्रातील जाणकारांना आणखीही काही दिसू शकतील. मला वाटतं जर वरील दोष आपण टाळू शकलो, तर चर्चा अधिक काटेकोर, तर्कशुद्ध व निर्दोष पद्धतीने करू शकू व सोशल मिडीयातील चर्चेची खोली वाढविण्यास आपला हातभारही लागेल. ❖❖❖

---



अनुक्रमणिका

# शेती, शेतकरी आणि शासन -

लेखांक - १७

श्री. के. वनपाल

ही एका कर्तृत्ववान शेतक-याची कहाणी.

तालुक्याच्या अगदी कोप-यात असलेलं त्याचं गाव गावाच्या पूर्वेला एक मोठा तलाव बांधण्याचं काम सुरू झालं. पण ते मध्येच बंद पडलं. त्या तलावाच्या पाण्याचा सर्वात जास्त उपयोग ह्या आमच्या नायकाला होणार होता. (आपण याचं नाव 'दत्तोबा' ठेवू) पाणी आलं तर आपली द्राक्षाची बाग दत्तोबाला आणखी मोठी करता येणार होती. तेव्हा दत्तोबानं तालुक्याचे, जिल्ह्याचे सगळे अधिकारी धुंडाळले आणि काम का बंद पडले याची माहिती काढली. खरं कारण कळलं. दादासाहेब देवचाके हे त्या भागातले प्रसिद्ध पुढारी. त्यांनीच खोडा घातला होता. तलावाचं पाणी शेतक-यांना मिळालं, तर शेतकरी मंडळी गबर होती आणि आपल्या लगामी राहणार नाहीत ही दादासाहेबांला भीती होती.

आता दत्तोबानं ओळखलं की, आपला दावेदार कोण, ते.

(१)

दत्तोबानं दादासाहेबाला पाण्यात पाहाणा-या पुढा-यांची आणि वजनदार धेंडांची गाठ घ्यायला सुरुवात केली. पण हे सर्व थोडे मवाळ निघाले. ते दादासाहेबाचा मनातून हेवा करीत; पण राजकारणात त्यांची बरोबरी करतील इतके वजनदार हे लोक नव्हते.

मगं दत्तोबांनी आणखी वजनदार पुढा-याला गाठलं. त्याच्याशी दत्तोबाचं बोलणं झालं ते असं,

"तात्या, मी काय म्हणतो, तलावाचं काम चांगलं चालू होतं. मध्येच बंद कश्यापायी पडलं?"

"काही माहीत नाही बा! पण असं का म्हणता? तांत्रिक अडचणी असतील, पैसे कमी पडले असतील, असं असेल काही तरी! मंजूर कामं अशी मध्येच बंद पडत नाहीत."

"तात्या, तुम्हाला काहीच माहीत नाही, म्हणा की! अहो बजेट प्रोव्हिजन आहे, अधिकारी मंडळी चांगली आहेत. पण वरून कोणीतरी दबाव आणतंय. मोठी मशिनरी मुद्दाम दुस-या तलावावर हलवली जात्येय, ज्युनियर इंजिनियर्सना बदलीचा धाक दाखवला जातोय, फिटरला पैसे देऊन एखादं यंत्र नादुरुस्त केलं जातेय. काय काय करायचं ते करतोय. हा तलाव होता कामा नये, अशी रोज तजवीज चालल्येय. मी तिथल्याच माणसाकडनं सगळी माहिती काढलीय. बरं, मला पण निरोप की, दुसरी कामं झाली की, या तलावाचं काम करूच करू!"

"बरं मग? पण समजा, तो म्हणतो ते खरं असलं, तर आपण उगाचंच त्याच्या विरोधात गेलो असं होईल. निष्कारण भांडण होईल आणि चिघळत जाईल! आपलं काम आणखी लांबणीवर पडायचं मग?"

"तेच तर म्हणतो ना मी. नग त्याच्या वाटेला जायला. काही दिवस थांबा. मी सांगतो येऊन काय करायचे ते. तुमच्याच विचारांच्या इतर असाम्यांना बी भेटतो. ते काय म्हणतायत ते बघतो. मग एकत्रित बसून काय धोरण ठरवायचं ते ठरवू."

"हां, त्येचं ब्येस होइंल, दत्तबा. बघा इतरांचं काम ठरतंय ते, अन् मला सांगा. तुम्ही म्हणाल, तसंच करू."

हा तर पटला! आता दुसरीकडे जाऊ, असा विचार करून दत्तोबा उठले. "येतो, काही वेगळा विचार करू नका", असं म्हणत दत्तोबांनी काढता पाय घेतला.

तलावातून ज्यांना पाणी-पुरवठा होणार होता अशा मोठ्या गावात जाऊनं दत्तोबाने सरपंच, सोसायट्यांचे चेअरमेन, जिल्हापरिषदेचे सभासद, पंचायतींचे सभापती व सभासद यांना गाठायला सुरुवात केली. बाकीच्यांना या तलावाची व नव्या योजनांची काहीच माहिति नव्हती. ती आता होऊ लागली. तलावाच्या अडवणुकीचे कळल्यावर ही सगळी माणसें बिथरली.

अनुक्रमणिका

पण आत्ता दत्तोबाने नवीच खेळी ठरवली. तो म्हणाला की, लोकांची तलावाच्या अडवणुकीच्या विरोधात एकजूट झाली तरी दादासाहेबांच्या विरोधात जायचे नाही. उलट, तुम्हीच 'आमचे तारणहार, तुम्हीच उशीर करणारे, तुम्ही तलावाचे काम मार्गी लावून आमचे दुवे घ्या' असे म्हणून दादासाहेबांच्या मागे लागायचे. मग दादासाहेबांना खात्री पटेल ही सगळी जनता पुढच्या निवडणुकीत आपल्या मागे उभी राहील. दादासाहेब जबरदस्त आहेत. ते काम पुढे करून देतील. मग पुढे बघू काय करायचं ते.

(२)

दत्तोबांनी दुसरे पुढारी मामासाहेब यांच्याशी बोलणं काढलं. पण मामासाहेबांनी दत्तोबांचीच झाडाझडती सुरू केली. दत्तोबांनी तलावाचा प्रश्न काढण्यावर मामासाहेब म्हणाले, "मला तुमचं पटत नाही. तलाव झाला पाहिजे, हे माझं मत आहे. तो व्हायलाच हवा. पण कुणी ते काम अडवत असंल, असं मला वाटत नाही. बाबा, ते शासनाचं काम आहे. ते कसं थांबवता येईल, कुण्या लुंग्यासुंग्याला. तुम्ही पक्की माहिती काढा. मग बघता येईल."

अरेच्चा! हा मामा त्या दादासाहेबाचाच चमचा निघाला! याचा नाद सोडला पाहिजे. हा आपल्याला बोलूही देत नाही. दत्तोबांनी बोलणं थांबवले. म्हणाले, 'सोडू या मामाला.'

दत्तोबांनी मग गावात वजन असलेली पण पुढारी नसलेली अशी साधी माणसं मिळवली. त्यांना आपलं म्हणणं पटवलं. जवळ जवळ २५-३० गावातली माणसं दत्तोबाच्या बाजूला आली. मग त्यांनी एक दिवस त्या माणसांना आपल्या द्राक्षाच्या बागेत जेवण दिल. पाण्याविना बाग करपत चालली आहे, हे सगळ्यांना दिसावं, हा हेतू.

जेवण झाल्यावर दत्तोबांनी विषय काढला. "मंडळी, तलावाचं काम गेले वर्ष-दीडवर्ष कुणामुळं खोळंबलंय ते तुम्हाला सांगितले. आता पुढं कसं?"

एक जण चवताळून उठला. "सगळे मिळून जाऊ या आपल्या आमदाराकडे आणि पुढे मंत्र्याकडे. आपण लावू सगळा प्रश्न धसाला. आपल्या विरोधात जातो काय? शिकवू या धडा, कसं?"

दत्तोबांच्या मनात दुसरंच दळण चाललं होतं. कष्टानं जमवलंय सगळ्यांना एकत्र. पण यांच्यातलं कुणी फितूर झालं तर? दादासाहेबालाच जाऊन मिळालं तर! कसा विषय काढावा? आपला अंतस्थ विचार आत्ताच सांगून टाकावा का? का जरा बेतानं घ्यावं?

दत्तोबा थोड्या वेळानं म्हणाले, मला काय वाटतंय; म्हणजे बघा हं पटतंय का; ते. आपण पहिल्यांदा दादासाहेबांकडेच जाऊ. त्यांच्या पोटातलं काढून घेऊ. म्हणजे असं की, त्यानं काही आपल्याशी अजून दावा मांडलेला नाही. माझा तगादा पाहून. तो, अजून तरी, मला निरोप पाठवतो की, 'करू या, करू या' म्हणून. पण त्याला तलावाच्या कामाला खोडा घालायचा आहे, हे नक्की. आपण असं करू, हा विषय माझ्या एकट्याचाच नाही; आपल्या सगळ्यांचा आहे, असं त्याला सांगू. पाहू काय म्हणतो, ते. समजा तो म्हणालाचं की, 'करू लवकरच सुरुवात', तर कोणत्या महिन्यात काय काम काढणार याचा अंदाज त्याच्याकडून घेऊ. बोलणं चालताना आपल्याला कळेलच की, थापा मारतोय की खरंच आपल्या बाजूचा आहे. आपल्या बाजूचा आहे असं वाटलं, तर आणखी खुशामत करून बघू. इतकी बडबड करू की, त्यानं होय म्हटलं पाहिजे. 'आत्ता निवडणुका आल्यात, तुम्हालाच मत देऊ', असं आश्वासन द्यायचं नाही. तसा विषय काढायच्या आतच बैठक संपवू, उगीच शब्द जायला नको. महिनाभर वाट बघू. जर काम सुरू झालं तर गप पाहात राहू. त्याला वाटेल; कामं संपल्यावर ही माणसं आपलीच होतील. 'जसं जसं घडत जाईल, तसा तसा मार्ग काढू, कस?' सगळ्यांनी आपली मतं मांडली. पण दत्तोबाचंच म्हणणं सगळ्यांनी मान्य केलं.

(३)

महिन्याभरात खरंच तलावाचं काम जोरात सुरू झालं. पावसाळ्याच्या आत काम पुरं करण्याचा विडाच जणू दादासाहेबांनी उचलला होता. 'काम बघून जात जा, रे' असे त्यांचे निरोप येऊ लागले आणि गंमत म्हणजे सगळ्यांशी झालेल्या एकाच भेटीचा परिणाम म्हणून मृग लागण्याच्या आत काम संपलं देखील.

दत्तोबा खूश. पुनः सगळ्यांना घेऊन तो दादासाहेबाच्या भेटीला गेला. त्यांचा हार-गुच्छ देऊन सत्कार केला.

भाषणं केली. सगळे परतले.

निवडणुका आल्या. दत्तोबानं बैठका घ्यायला सुरुवात केली. लोकांना त्यांची खरी खरी मतं विचारली. एक-दोघांना आपले पितू करून दादासाहेबांच्या विरोधात त्यांनी बोलावं अशी योजना केली. ते लोकांना सांगू लागले, "दत्तोबा म्हणाले म्हणून आपण दादासाहेबाकडे गेलो. त्या वेळी पाहिलंत ना, आपल्याला पाहून किती हरकला होता ते! पण तो काय लायकीचा माणूस हाय, ते आपल्याला माहीत नाही का? ते काय नाय. दादासाहेबाला पुढं सरकू द्यायचं नाही. अहो, एवढ्याश्या पदावर गेला तर त्यानं आपल्याला कसं वेठीना धरलं होत, पाहिलंत ना? आणखी पुढे गेला तर लई गमज्या करील. नाही; आम्ही तरी दादासाहेबाला आपल्या चार-पाच गावातली मतं मिळू देणार नाही."

हळूहळू हे मत पसरत चाललं. दत्तोबांची छाप लोकांवर व छोट्या पुढा-यांवर पडायला लागली होती.

"मग आता कसं करायचं? एकानं विचारलं. दत्तोबांनी उत्तर दिलं", आपण असं करू, पुनः एकदा भेटू आणि ठरवू. अजून थोडा अवकाश आहे. जिल्हा परिषदेच्या अध्यक्षाचं आरक्षण ठरू द्या. मग ठरवू. दादासाहेबां विरुद्ध कोण उमेदवार उभा करायचा, तेही पाहावं लागेल. मात्र आपल्या बैठकीचा सुगावा दादासाहेबाला लागू देऊ नका. उगीच आत्ताच नासक्या दुधाचं विरजण नको. दहा-बारा दिवसांनी जमू या सगळे.

जिल्हा परिषदेच्या अध्यक्षपदाचं आरक्षण महिलेला गेल्याचं जाहीर झालं. आता काम आणखी सोपं झाले.

दत्तोबांनी पुनः बैठक बोलावली. दत्तोबा म्हणाले, "आता कसं करू या? दादासाहेबाच्या जवळचं कुणी शिकलं सवरलेलं नाही. त्याने कुणी स्त्री उमेदवार दिला तर आपण कुणी शिकली सवरलेली स्त्री उभी करू. बघू दादासाहेब कुणाला उभी करतोय ते. पण आपली उमदेवार कोण हे आताच नक्की करू. योग्य वेळ येताच तिचं नाव पुढे करू."

अगोदरचं ठरल्याप्रमाणं दत्तोबांच्या पित्रूंनी दत्तोबांच्या पत्नीचंच नाव सुचवलं. दत्तोबांनी खूप आढेवेढे घेतले. 'नको, नको,' केलं. 'बायकोला विचारून ठरवावं लागतं, बाबानो!' असंही म्हटलं. पण तो जितका टाळाटाळीचा देखावा करू लागला तितका लोकांचा आग्रह वाढूच लागला. शेवटी दत्तोबांनी "बरं, सांगून बघतो बाईंना", असं म्हणत होकार दिला.

निवडणुका लागल्या. प्रचाराची धुळवड झाली. दत्तोबाची पत्नी शिकलेली आणि विरोधी उमदेवार अनपढ या मुद्यावरच निवडणूक दत्तोबांनी लढवली आणि जिंकली!

कुणाला काही कळलं नाही; ना दादासाहेबाला, ना दत्तोबाच्या मित्रमंडळीला पण दत्तोबांचे दोन्ही हेतू तडीस गेले होते. एक तलावाच्या कामाचा आणि दुसरा दादासाहेबाला माती चारण्याचा.

(४)

दत्तोबा फार धोरणी जिल्हा परिषदेची तांबड्या दिव्याची गाडी दत्तोबांच्या बायकोसाठी; पण त्यातून दत्तोबाच फिरायचे. जिल्हा परिषदेची धोरण ठरवायला आणि त्यातून फायदा वाटायला दत्तोबाचं.

काही दिवसांनी खूप अभ्यास करून दत्तोबांनी ठरवलं की, एक शेतकी कॉलेज काढायचं. त्याची अट अशी की, संस्थेकडे कमीत-कमी १२० एकर जमीन हवी. दत्तोबांनी मोक्याच्या ठिकाणी असलेली सलग १२० एकर जमीन एकराला रु. ५०,०००/- दरानं विकत घेतली! विद्यार्थ्यांच्या राहण्या-जेवण्याची सोय असलेलं आधुनिक वसतिगृह स्थापलं. शेती कॉलेज दिमाखात चालू लागलं.

आमचे गुरू प्रा. देवदत्त दाभोलकर सांगत असत की, शेतकरी अडाणी नाही. तो शास्त्रज्ञ आहे. एक दाणा पेरून ५०० दाण्यांच कणीस तो उगवून दाखवतो. पूर्वेकडे वीज चमकली की, किती दिवसात पाऊस येणार याचा हिशेब तो मांडतो. त्याच्या घरात व आसपास अव्यवस्था कदाचित आढळेल, पण नांगरलेल्या शेतात तण दिसणार नाही. जिथं पीक येण शक्य नाही तेथे तो गवत किंवा हुलगा पिकवील. तो अमेरिकेतल्या धनाढ्य शेतक-यापेक्षा सरस आहे कारण कोणतंही संसाधन हाताशी नसताना तो शेती करतो आणि आपल्या सगळ्यांचं पोट भरतो.

दत्तोबांच्या उदाहरणाने मी हे शिकलो की, शेतकरी केवळ पीक-पाणी घेत नाही; तो जन्मजात उद्योजकही असतो.

❖❖❖

# अभिव्यक्ती स्वातंत्र्य की स्वातंत्र्याची अभिव्यक्ती!

बाबूराव चंदावार

**प्रस्तावना :**

अभिव्यक्ती स्वातंत्र्याविषयी अलीकडे बरेच काही बोलले जाते आहे. अर्थात, ते सर्वसामान्यपणे स्वातंत्र्याच्या इच्छा-आकांक्षेतलेच असते व आहे. पण, स्वातंत्र्या-बरोबरच त्याची प्राप्त झालेली कर्तव्येही स्वीकारायचीच असतात व ती पाळावयाचीही असतात, याचे भान ठेवले जात नसावे, तेव्हा स्वातंत्र्याच्या अधिकाराबरोबरच प्राप्त झालेल्या स्वातंत्र्याच्या कर्तव्यांचे ही भान ठेवायचेच असते; हे लक्षात घेऊनच अभिव्यक्ती स्वातंत्र्याचा विचार करायला हवा. अर्थात, स्वातंत्र्याच्या प्राप्त कर्तव्यांचे भान ठेऊनच अभिव्यक्ती स्वातंत्र्याचा विचार केला जाऊ शकतो.

**१) नाइलाजास्तव जगण्याचा संकेत :**

स्वातंत्र्य हा 'जन्मसिद्ध अधिकार' आहे, हे जगात सर्वत्रच सर्वसामान्यपणे मान्य झाले आहे. पण, स्वातंत्र्याचा अधिकार मिळविण्यासाठी जी काही प्रक्रिया सुरू ठेवायला हवी असते, ती स्वातंत्र्यासोबत प्राप्त झालेल्या कर्तव्यपालनातूनच शक्य होऊ शकेल, हे मात्र सध्याची परिस्थिती लक्षात घेता अद्याप मान्य झालेलेच नसावे, असे वाटते! कारण, स्वातंत्र्याच्या अधिकाराबाबतीत जेवढी व जशी उत्सुकता दिसून येते तेवढी व तशीच उत्सुकता स्वातंत्र्याच्या प्राप्त कर्तव्याबाबतीत दिसून येतच नाही. अर्थात, याचे काही एक भान न ठेवताच जेव्हा अभिव्यक्ती स्वातंत्र्याच्या बाबतीत आग्रहपूर्वक बोलले जाते, तेव्हा वाटते की, ही एक भान सुटलेली अवस्थाच असावी! अर्थात, स्वातंत्र्याच्या प्राप्त कर्तव्याबाबतीत भान ठेवता येत नसल्यास स्वातंत्र्याचा अधिकार किंवा अभिव्यक्तीचे स्वातंत्र्य या दोन्ही निरर्थक ठरू शकतात! पण, ही एक जगातल्या स्वातंत्र्य प्रेमींची अगतिक अवस्थाच म्हणायला हवी. कारण, जी स्वातंत्र्यास्तव स्वीकारण्याच्या व पाळण्याच्याही असतात त्या कर्तव्यांच्या अभावातलीच ही अवस्था असल्यामुळे, केवळ राजकीय स्वातंत्र्यातून 'अभिव्यक्ती स्वातंत्र्य' मिळवता येत नसल्याची किंवा ती मिळत नसल्याची ही एक वस्तुस्थितीच म्हणायलाही हवी! म्हणून, राजकीय स्वातंत्र्यातून निश्चितपणे 'अभिव्यक्ती स्वातंत्र्य' मिळवता येऊ शकते किंवा काय यावर विचार करायला हवा. कारण, राजकीय स्वातंत्र्य ज्या राज्यघटनात्मक (कॉन्स्टिट्यूशनल) राजकीय व्यवस्थेच्या मर्यादेतले असते, त्यातून निश्चितपणे अभिव्यक्तीच्या स्वातंत्र्याला संधी उपलब्ध होऊ शकते किंवा काय, यावर फारसा विचारच केला जात नाही. अर्थात, यावर विचार करणे शक्य होऊ शकेल किंवा काय याचा उलगडाही अद्याप करता आलेला नाही किंवा उलगडा होऊ शकलेलाही नाही. तेव्हा, माणसाचे स्वातंत्र्य ज्या 'अभिव्यक्ती स्वातंत्र्या'च्या अर्थानेही ओळखता यायला हवे अशी अभिलाषा बाळगली जाते आहे, ती राज्यघटनात्मक राजकीय व्यवस्थेच्या मर्यादेत जर करपून जात असेल, तर ती तशी करपू द्यायची किंवा काय, हे स्वातंत्र्याच्या आस्थेवाईक भूमिकेतूनच ठरवायचे असते व ठरवायला हवे! पण, या आधी राज्यघटनात्मक राजकीय व्यवस्थेच्या मर्यादेत स्वातंत्र्य गेल्याने स्वातंत्र्याच्या भूमिकेचा -हास झाला व होऊ शकतो किंवा काय हे ठरवून घ्यायला हवे. यासाठी जी एक मानसिकता उपलब्ध असावयाला हवी असते, त्याचाच जर अभाव झाला असेल किंवा होत असेल, तर शेवटी स्वातंत्र्याची वा अभिव्यक्ती स्वातंत्र्याची अपेक्षा केली जाणे किंवा तशी इच्छा-आकांक्षा बाळगणे कितपत योग्य मानायचे असते किंवा योग्य मानायला नकोच असते, हे देखील लक्षात घ्यावे लागेल. म्हणजे राज्यघटनात्मक (कॉन्स्टिट्यूशनल) राजकीय मर्यादेत व्यक्तीच्या स्वातंत्र्याचे किंवा त्याच्या 'अभिव्यक्ती स्वातंत्र्या'चे काय होत असेल, याकडे

जागरूकपणे पाहिलेच जात नसावे व म्हणूनच राज्यघटनात्मक राजकीय मर्यादेत 'व्यक्तीचे स्वातंत्र्य' व 'अभिव्यक्ती स्वातंत्र्य' या दोन्ही करपून जाण्यास संधी उपलब्ध झाली असावी किंवा काय याचा उलगडा करून घ्यायला हवा. कारण, राज्यघटनात्मक राजकीय मर्यादेतच स्वातंत्र्य व 'अभिव्यक्तीचे स्वातंत्र्य' या दोन्हीं मर्यादित करून ठेवण्याचा प्रयत्न केला जातो व त्याची एक कार्यपद्धती राजकीय स्वातंत्र्यात अनुसरली जातही असतेच! अर्थात, या स्थितीतच तडजोड करून व्यक्तीने स्वतःला त्या मर्यादेतच जगण्याचा अभ्यास करायला हवा व स्वतःचे जगणे यातूनच नाईलाजाने शक्य करून घ्यायला हवे, असाच एक सक्तीचा संकेत यातून मिळतो व जगातल्या राजकीय स्वातंत्र्यातल्या लोकसमूहांना आजवर हाच सक्तीचा संकेत मिळत आलेलाही आहे, हे दृष्टीआड करून चालण्यासारखे नसते व नाही.

**२) स्वातंत्र्य-संघर्षाचा सुपरिणाम :**

स्वातंत्र्य मर्यादित नसते व नाही. म्हणूनच त्याची व्याप्तीही असते व आहे, हे जरी मान्य केले, तरीही राजकीय स्वातंत्र्याच्या बाबतीतही हे असेच म्हणता येत नाही व म्हणता येण्यासारखेही नाही! यामुळेच निखळ स्वातंत्र्य व राजकीय स्वातंत्र्य या दोहोत फरक करूनच स्वातंत्र्याचा विचार करायला हवा. पण, हे शक्य होताना दिसत नाही आहे. कारण, राजकीय स्वातंत्र्यातूनच ख-याखु-या किंवा वस्तुस्थिती निदर्शक स्वातंत्र्याकडे जाता येते किंवा जाता येऊ शकते, असेच मानले गेले असावे व याचीच जागतिक पातळीवर मानसिकता निर्माण झालेलीही दिसतेच आहे! यातूनच स्वातंत्र्याची इच्छा-आकांक्षा फुलवीत ठेवली गेलेली आहे. याचाच एक मानवीय इतिहास घडलेलाही आहे, असेच म्हणताही येईल! 'अभिव्यक्ती स्वातंत्र्य'ही यातलेच असल्यामुळे त्याची वेगळी म्हणजे स्वतंत्र अशी कोणतीच अभिव्यक्ती अस्तित्वात आलेलीही नाही, हे उघडच दिसतही आहे. पण, 'स्वातंत्र्य' किंवा 'अभिव्यक्ती स्वातंत्र्य' या दोन्हीं राज्यघटनात्मक राजकीय व्यवस्थेच्या मर्यादेतच राहू शकल्यामुळे व त्या तशा राहूनच वावरत असल्यामुळेही राजकीय नियंत्रणातलेच ते असेल व असू शकेल, याची वस्तुस्थिती लक्षात घ्यायला हवीच होती! अर्थात, ही वस्तुस्थिती काही प्रमाणात जरी लक्षात घेतली गेली असली, तरी स्वातंत्र्याचा निखळपणा ज्या व्याप्तीतूनच येऊ शकतो व येतच असतो, त्याचे विस्मरण स्वातंत्र्याचा आस्थेतल्या मानवीय स्वभावाला सहसा होत नसतो व होतही नाही! म्हणून, हा स्वभाव स्वातंत्र्याच्या व्यापकतेतल्या निखळतेचा अनुभव घेत राहण्यासाठीच बाळगला जात असल्यामुळे कोणत्याही राज्यघटनात्मक राजकीय मर्यादेतले स्वातंत्र्य या स्वभावाला जाचक ठरते आहे. पण, ही जाचकता सोसतच जाणे जगातल्या लोकजीवनाची नियती झालीही आहे, हे अर्थातच लक्षात घ्यायला हवे! पण, ही नियती मुळातच निखळ स्वातंत्र्याची नसल्यामुळे यातले जगणे लोकजीवनाला सुखावह होत नसते व सुखावह झालेलेही नाही! पण, म्हणूनच निखळ स्वातंत्र्यासाठी राज्यघटनात्मक राजकीय नियंत्रणातले स्वातंत्र्यच मन मारून जगण्याची परिस्थिती जागतिक लोकजीवनाची होऊन बसलेलीही आहे. यातून सुटका करून घ्यायला हवी, असेच जर वाटले व मानले, तर राज्यघटनात्मक राजकीय मर्यादेतल्या स्वातंत्र्यापेक्षा नितांत वेगळ्या निखळ स्वातंत्र्याचा विचार करायला हवा व ते मिळवायलाही हवे! पण, हे कसे शक्य व्हावे, असा प्रश्न उपस्थित होतो व तो उपस्थित झालाही आहे. कारण, 'स्वातंत्र्य' किंवा 'अभिव्यक्तीचे स्वातंत्र्य' राजकीय मर्यादेतल्या स्वातंत्र्यात प्राप्त होत नाही, याची तक्रार शिल्लक उरलेलीच आहे व ती जीव कासावीस करीत असल्याचे निदर्शक वाटतेही आहे! तेव्हा, स्वातंत्र्याला राज्यघटनात्मक राजकीय व्यवस्थेची मर्यादा पडत असल्यामुळे निखळ स्वातंत्र्य उपभोगायचे कसे, असा प्रश्न उपस्थित झाला आहे. यामुळे 'व्यक्ती-स्वातंत्र्य' या चित्ताकर्षक संकल्पनेकडे तो लोकजीवनाला आकर्षून घेत असतो व घेतही आहे. म्हणून, स्वातंत्र्याच्या संकल्पनांची जी विविधता दृगोच्चर होत असते व आजवर दृगोच्चर होत आलेलीही आहे. त्यातलीच एक 'अभिव्यक्ती स्वातंत्र्य' ही संकल्पना जशी आहे, तशीच 'व्यक्ति-स्वातंत्र्य' ही संकल्पनादेखील अस्तित्वात आलेलीच आहे. 'अभिव्यक्ती स्वातंत्र्य' व 'व्यक्ति-स्वातंत्र्य' या दोन्हीं वाटायला व दिसायला भिन्न वाटतात व दिसतात. पण, 'अभिव्यक्ती स्वातंत्र्यात'ली व्यक्ती व 'व्यक्ति-

स्वातंत्र्यात'ली व्यक्ती या दोन्हीं एकच आहेत म्हणून, यामुळें स्वातंत्र्याची संकल्पना व्यक्तिकेन्द्रित केलीही जाते आहे व केली गेलीही आहे! पण, यातल्या व्यक्ती आणि व्यक्तिंचा समूह अथवा समाज असा भेद करूनच व्यक्तीचे स्वातंत्र्य व सामाजिक स्वातंत्र्य या स्वातंत्र्याच्या दोन स्वतंत्र जाणिवा अस्तित्वात येऊ शकल्या. हे देखील लक्षात घ्यायलाच हवे! तेव्हा, स्वातंत्र्याची निखळ अवस्था म्हणून ज्याची कल्पना केली जाऊ शकते, त्याच्या दिग्दर्शनाच्या मार्गात अनेक परीने व्यवधाने येऊ शकतात म्हणून, स्वातंत्र्याच्या जाणीव विकासाच्या मार्गातल्या अडचणीही वाढतच गेलेल्या आहेत. असे जरी काही असले, तरी माणसाच्या अस्तित्व रक्षणाशीच त्याचे स्वातंत्र्य निगडीत असल्यामुळे, या सर्व अडचणींचे निवारण करून पुढे जावेच लागते आहे! अर्थात अडचणींचे निवारण करण्याच्या वृत्तीची जोपासना करण्याच्या हेतूनेच व्यक्तीला स्वातंत्र्यास्तव संघर्ष करावाही लागतोच आहे व त्यात सातत्य ठेवावेही लागतेच आहे! म्हणूनच सतत चालू असणारा हा संघर्ष आहे ज्याला 'स्वातंत्र्य-संघर्ष' म्हटले गेले आहे. अर्थात, हा स्वातंत्र्यास्तव केला जाणारा संघर्ष राज्यघटनात्मक (कॉन्स्टिट्यूशनल) राजकीयतेच्या मर्यादेत अडकवून ठेवता कामा नये. कारण, तो या मर्यादेत अडकवून ठेवला गेल्यास राज्यघटनात्मक राजकीय मर्यादेतच 'स्वातंत्र्य-संघर्ष' संपुष्टात येऊही शकतो. अर्थात, राज्यघटनात्मक, राजकीय मर्यादेतच अडकवून 'स्वातंत्र्य-संघर्ष' संपुष्टात आणण्याचा उद्देशही राजकीयतेचा असतो. याचा प्रत्यय इतिहासातल्या स्वातंत्र्याच्या सतत होत आलेल्या अनेकानेक संघर्ष पर्वात आलेलाच होता व तोच प्रत्यय अजूनही येतोच आहे! म्हणून, (स्व.) जयप्रकाश नारायण यांनी 'स्वातंत्र्याचा संघर्ष ही एक सतत चालत राहणारी प्रक्रिया आहे' असे जे म्हटले होते ते या ठिकाणी लक्षात घेणे गरजेचे होऊन बसते. तेव्हा, स्वातंत्र्याचा संघर्ष ही एक सततची प्रक्रिया मानूनच त्यावर विचार करण्याचीच स्वातंत्र्याकडे जाण्याची एक दिशा व दृष्टी आहे. अशा या स्वातंत्र्य-संघर्षाचे स्वरूप निखळ स्वातंत्र्य प्राप्तीनेच कसे घडवता येईल हा एक प्रश्न उपस्थित होतो. म्हणजे ते घडवता यावे म्हणूनच सक्रियता स्पष्ट करण्याची मानसिकता निर्माण व्हावयाला हवी असते. ती योग्य त्या किंवा पुरेशा प्रमाणात निर्माण झाली तरच माणसाच्या निखळ स्वातंत्र्याची प्राप्ती माणसाला निर्विघ्नपणे करता येऊ शकेल. अर्थात, यालाच स्वातंत्र्य-संघर्षाचा सुपरिणाम किंवा यथायोग्य परिणाम म्हणायलाही हवा!

**३) व्यक्ति-स्वातंत्र्याचा संदर्भ :-**

इतिहासात घडलेला स्वातंत्र्याचा संघर्ष ज्या एका परिणामाकडे नेणारा म्हणता येऊ शकेल, त्याची यथायोग्य ओळख करून घ्यायला हवी! या बाबतीत स्वातंत्र्य-संघर्षाचा वेग राजकीय मर्यादेत मंदावला अर्थात थांबला किंवा काय, याचा शोध घेऊन त्या विषयीजाणून घ्यावे लागेल. कारण, 'स्वातंत्र्य-संघर्ष' झाले व होतच असतात! पण, ते निखळ परिणामकारितेच्या हाती लागतच नसावेत, अशीच काहीशी परिस्थिती झालेली असावी. अर्थात, जे सप्रमाण वाटू शकते किंवा वाटतेच ते बौद्धिक पातळीवरचे विश्लेषण करूनच केवळ जाणून घेता येईल, असेही मानू नये! भावनिक पातळीवरही याचे विश्लेषण करूनही ते जाणून घ्यायला हवे! कारण, बुद्धिप्रामाण्यतेचे विश्लेषण महत्त्वाचेच जरी मानले, तरी भावनात्मकतेच्या अभावी हे विश्लेषण मानवीय पातळीवर ठेवणे बहुदा किंवा अनेकदा शक्य होतही नसते! पण, स्वातंत्र्याची निखळता ही जशी बुद्धिप्रामाण्याच्या निकषावर उतरायला हवी असते, तशीच ती भावनिक निकषावरही उतरायला हवीच असते. कारण, बुद्धिप्रामाण्यता व भावनिकता या दोहोंच्या यथायोग्य संयोगातलेच निखळ स्वातंत्र्य असते म्हणूनच निखळ स्वातंत्र्याचा निकष मानवीयतेतलाच असतो. कारण, बुद्धिप्रामाण्य व भावनिकता या दोहोंच्या यथायोग्य समन्वयातूनच मानवीयता अस्तित्वात येत असते. हेच मान्य करून निखळ स्वातंत्र्याचा बोध करून घेता येऊ शकतो व त्याचा शोधही घेता येऊ शकतोच! या दृष्टीने विचार करताना लक्षात येते ते असे, की निखळ स्वातंत्र्याच्या बाबतीत जी समज शक्ती निर्माण करून तिचा विकास ज्या एका प्रमाणात व्हावयाला हवा असतो, तो तसा होऊ शकलेलाच नसावा, असे वाटत राहते. अर्थात, याची कारणेही आहेतच! पण, ती जाणून घ्यायला हवीत.

पण, या बाबतीत व्यक्ति-जीवनाचा मूल्य-विचार सर्वाधिक महत्त्वाचा ठरतो, ज्याकडे कोणत्याना कोणत्या कारणांमुळें दुर्लक्ष केले जाते आहे. म्हणूंनच कदाचित

निखळ स्वातंत्र्याच्या मार्गात ज्या अडचणी निर्माण होतात त्यांचे निवारण करणे शक्य होत नसावे, याचे सप्रमाण विवेचन करणे अपेक्षित आहे. अर्थातच जमेल तसे व जेवढे जमेल तेवढे तरी याचे विवेचन करायलाच हवे! यात काही उणीवा राहून जाऊ शकतात व त्या कदाचित घातकही मानता येऊ शकतील! पण, उणीवा राहून गेल्या व जरी त्या निखळ स्वातंत्र्याच्या विवेचनाला काही अपरिहार्य कारणास्तव पोषक होऊ न शकल्या, तरीही अनावधानामुळें किंवा अन्य कशाही कारणांमुळें उणीवा राहूनच जातील त्या निखळ स्वातंत्र्याच्या विवेचनाला घातक होऊ नये, याची खबरदारी तर घ्यायलाच हवी! याच दृष्टीने स्वातंत्र्याला, व्यक्तिस्वातंत्र्याला सामाजिकतेचा आशय प्राप्त होण्याची शक्यता जशी गृहित धरली जाऊ शकेल, तशीच शक्यता व्यक्तिस्वातंत्र्याच्या बाबतीतही गृहीत धरली जाऊ शकेल किंवा काय, हा प्रश्न उपस्थित होतो. हा प्रश्न विकसित म्हणवल्या गेलेल्या राष्ट्रातल्या लोकांच्या जीवनशैलीतून प्रकर्षाने जाणवत राहतो. कारण, विकसित म्हणवल्या गेलेल्या अनेक राष्ट्रातल्या लोकांच्या जीवनशैलीत व्यक्तिकेन्द्रितपणा ज्या प्रमाणात दिसून येतो किंवा अनुभवाला येतो, त्यावरून अशा व्यक्ति-केन्द्रित जीवनशैलीला सामाजिकतेचा आशय-स्पर्शच करीत नसावा, असे नुसतेच वाटत नाही, तर ते वस्तुस्थितीचे निदर्शकही म्हणता येऊ शकते! अर्थात, हे पुराव्यानिशी सिद्ध करता येण्याची परिस्थिती ही अमेरिकेसारख्या राष्ट्रातल्या लोकजीवनात आकारलेलीच आहे! तेव्हा, व्यक्तिस्वातंत्र्यातला व्यक्तिकेन्द्रितपणा हा कौटुंबिकतेच्या बाबतीत विकृत अवस्थेतच दिसतो ही आहे! पण, यामुळें व्यक्तिस्वातंत्र्याचे महत्त्व अमान्य केले जाऊ नये, अशीच सर्वसाधारण धारणा झालेली दिसते. हीच धारणा भारतातल्या नगर-महानगरातूनही लक्ष्य वेधून घेण्याइतपत जाणवणारी होताना सध्या दिसते आहे. पण, म्हणूनच व्यक्तिस्वातंत्र्याचा विकृतार्थ दुर्लक्षून चालणारही नाही! याची आवर्जून दखल घ्यायला हवी. कारण, आग्रही व्यक्तिस्वातंत्र्यात, ज्यात स्वैराचाराचा अतिरेक झालेला असतो व आहे, त्यातून स्वातंत्र्याचा सामाजिक आशय हरवतो आहे किंवा हरवलाही आहे, असे म्हणावे लागेल. शिवाय व्यक्तिही विकृत होत असाव्यात, असेच आढळूनही येतेच आहे! विशेष करून लैंगिकतेच्या (सेक्स) बाबतीत हे प्रकर्षाने जाणवत असते. स्त्री-पुरुष संबंधातला संभोग हा भारताच्या संस्कृतीत वंशवृद्धीच्या संदर्भात प्रजो-त्पादनाच्या मर्यादेतच मान्य झालेला होता व आहे. यामुळेच स्त्री-पुरुष संभोगाला गृहस्थ धर्मातले धर्माचरणच मानलेही गेले आहे! पण, व्यक्तिस्वातंत्र्यात मात्र संभोग हा भूक मिटवणारी व तृष्णा शमवण्याची नैसर्गिक कृती मानली जात असावी! म्हणून, स्त्री-पुरुष संबंधांच्या कौटुंबिक मर्यादा नाहीशा करून फक्त भोगवासना तृप्तीस्तव या अशा संबंधांकडे पाहिले जाऊ लागले व यातून विकृत अवस्थेकडे भरकटतच जावे लागते ही आहे. अर्थात, याचे भान सुटत गेले आहे! भारतासारख्या मनुष्य संस्कृतीच्या आस्थेवाईक राष्ट्रातही याची नको तेवढी व तशी विकृत अभिव्यक्ती होताना दिसते आहे. तेव्हा, स्वातंत्र्याच्या संदर्भात व्यक्तिस्वातंत्र्याचे महत्त्व जरी मान्य केले जाते आहे, तरी व्यक्तिस्वातंत्र्यात कौटुंबिक नातेसंबंधातल्या मर्यादांचे उल्लंघन करून संभोगवादाचा अनियंत्रित स्वरूपात जो स्वीकार करण्याची शक्यता असते, त्यापासून मनुष्य जीवनाचे संरक्षण कसे करायचे हा प्रश्न उपस्थित होतो हा प्रश्न मनुष्य संस्कृतीशी सरळ सरळ संबंधित व निगडित आहे. म्हणून, व्यक्तिस्वातंत्र्य उपभोगण्यातून मनुष्य संस्कृतीच जर अमान्य केली जात असेल, तर त्यातून निपजणा-या विकृतीतून मानवीय भवितव्याचा प्रश्न अतिशय गुंतागुंतीचा होऊन बसेल व तोच नेमका विकसित म्हणवल्या गेलेल्या राष्ट्रांच्या लोकजीवनात प्रकर्षानेच जाणवू लागलेला आहे!

**४) विघातक मर्यादा उल्लंघन :-**

अभिव्यक्ती स्वातंत्र्य व व्यक्तिस्वातंत्र्य अर्थात अशा सर्वच स्वातंत्र्याच्या परिकल्पना विशिष्टतेतल्या जरी मानल्या जात असल्या, तरी या अशा विशिष्टतेतूनच स्वातंत्र्याचा निर्भेळ उपभोग घेण्याची वृत्ती विकसित केलीच जात नसेल किंवा ती विकसित होत नसेल, तर स्वातंत्र्य हे नुसतेच स्वैराचारातले राहून जाणारेच यामुळे होईल व होत असते. यामुळे माणसाच्या वृत्ती अधिकाधिक प्रमाणात विकृत करण्याकडेच ते पुढे जात असते. यातून स्वातंत्र्य हे जीवन साधक होण्याऐवजी जीवनविघातक होऊ नये, याचे भान स्वातंत्र्याच्या जाणिवेतून बाळगता

यायला हवे आहे. कारण, हे भान 'स्वातंत्र्याचा जन्मसिद्ध' अधिकार प्राप्त करण्यासाठी गरजेचे असते. म्हणून, जे स्वातंत्र्य सामाजिक आशयापासून वेगळे पडते ते जसे व्यक्तीच्या हिताचे संवर्धन करणारे असणार नाही तसेच ते सामाजिक हिताचे संवर्धन करणारेही असू शकणार नाही! जर या ठिकाणी स्वातंत्र्याची मर्यादा स्पष्ट होत असेल, तर सामाजिक आशयाच्या संदर्भातलेच ते नसूही शकेल! म्हणून, व्यक्तीचे स्वातंत्र्य सामाजिक स्वातंत्र्याच्या मर्यादांचे उल्लंघन करणारे नसावे व ते तसे नसेल तरच व्यक्तीचे जसे हित साधले जाणार आहे, तसेच सामाजिक हित ही साधलेच जाईल हे स्पष्टच आहे. म्हणून, स्वातंत्र्याचा निखळपणा हा सामाजिकतेच्या मर्यादेतच उमलू शकतो व उमलायलाही हवा, याची जाणीव बाळगणेच स्वातंत्र्याच्या संकल्पनेत मान्य व्हावयाला हवे आहे. नेमके हेच या वेळी अभिव्यक्ती स्वातंत्र्याच्या व व्यक्तिस्वातंत्र्याच्या अनावश्यक आस्थेतून नाकारले जाते आहे, असे वाटते. तेव्हा, व्यक्तीला वाटणारी व असणारी स्वातंत्र्याच्या आस्थेची संकल्पना सामाजिक स्वातंत्र्याच्या मर्यादांचे उल्लंघन करूनच साकारली जाऊ शकते, असा जो काही समज विकसित केला जातो आहे, तो नुसताच अनाठायी मानून चालत नाही, तर विघातकही मानायलाच हवा!

**५) सख्यत्त्वातले स्वातंत्र्याचे सुख :**

अर्थात, स्वातंत्र्याची अभिव्यक्ती कशा प्रकारे केली जाऊ शकते, याचा विचार महत्त्वाचा ठरतो पण, अभिव्यक्ती स्वातंत्र्य व व्यक्तिस्वातंत्र्य या दोन्ही संकल्पनातून स्वैर वर्तन केले जात असल्यामुळे मानवीयतेच्या संदर्भात जे अपराध वा गुन्हें घडून येण्याची शक्यता असते व प्रत्यक्षात अपराध वा गुन्हें घडूनही येतात त्याची यथार्थता लक्षात घेऊनच स्वातंत्र्याची अभिव्यक्ती कशी केली जावी, याचा विचार करणे शक्य होऊ शकेल! म्हणून, मानवीयतेच्या संदर्भातच स्वातंत्र्याची अभिव्यक्ती करता यायला हवी, अशीच एक या अभिव्यक्तीची मर्यादा होऊन बसते. कारण, स्वातंत्र्याची अभिव्यक्ती मानवीयतेची मर्यादा अव्हेरून केलीच जाऊ शकत नाही, हा समज भक्कम केल्याशिवाय स्वातंत्र्याच्या अभिव्यक्तीचा विचार करणे किंवा तो करता येणे शक्य होणारच नाही, यावर नितांत विश्वास ठेवायला हवा!

स्वातंत्र्य हे जसे स्वत:साठी स्वत:कडे घेतले जाते, तसेच ते दुस-याला दिलेही जाते. म्हणून देण्याघेण्याच्या क्रमातच स्वातंत्र्याचा वास असतो. हा वास म्हणजेच सामाजिक आशयाचा प्रमुख आधार अथवा पाया म्हणायला हवा. कारण, या पायाविना स्वातंत्र्याची जाणीव अस्तित्वात येत नाही. तेव्हा, स्वातंत्र्य देण्याचा व घेण्याचा क्रम निर्माण व्हावा लागतो. पण, ही एक कृती नव्हे व नसते, तर तो एक स्वभाव असतो. म्हणूनच, स्वातंत्र्याची जाणीव ही मानवीय स्वभावाची जाणीव म्हणायला हवी. 'स्वातंत्र्य हवे' असे जेव्हा म्हटले जाते, तेव्हा स्वातंत्र्याचे सुख हवे, असा त्याचा अर्थ असतो. ज्या स्वातंत्र्यातून सुख प्राप्त करता येतच नाही ते स्वातंत्र्यच नव्हे! म्हणून, ते एक स्वैर आचरणच असते व आहे. म्हणून, स्वैराचार करायला जरी मुक्त होता येत असले तरी स्वातंत्र्याचे सुख प्राप्त करून देणारे ते नसतेच! अर्थात, स्वैराचारातून स्वातंत्र्याचे सुख मिळतच नसते, हेंच यातून लक्षात घ्यायचे आहे व लक्षात घ्यायलाच हवे!

**६) स्वातंत्र्याच्या सकारात्मकतेकडे वळण्याची गरज**

'रूप पाहता लोचनी सुख झाले हो साजणी' या अभंगातल्या कडव्यातून रूप पाहताच डोळ्यांना सुख प्राप्त होत असते, असे म्हटले गेले आहे. अर्थात, पाहताच जे प्राप्त होते ते सुख असावे लागते. म्हणून, पाहण्यातच सुखाची आस असते किंवा असावी लागते. स्वातंत्र्याचेही असेच आहे. सुखाची आस म्हणजे आशा डोळ्यांत साठवून समोरच्याकडे पाहिले की त्यातूनच स्वत:ला व समोरच्याला सुख मिळत असते. तेव्हा, सुख हे डोळ्यांतील आशेच्या परिपक्वतेतले असते तेव्हाच त्यातून आस अथवा आशा किंवा त्यातून आस्थेचे अश्रु गळत असतात. याला भक्तिमार्गात 'सख्य' म्हटले गेलेले आहे. अर्थात, सख्यातून सुख प्राप्ती केली जाते, अन्य कशातूनही नव्हे, असाच याचा अर्थ आहे. स्वातंत्र्याचे सुखही सख्यत्त्वातूनच प्राप्त करता येऊ शकते. अर्थात, सख्याची वा सख्यत्त्वाची आशा हीच स्वातंत्र्याचे सुख प्राप्त करून देणारी शक्ती होय.

स्वातंत्र्याचे सुख प्राप्त करून देण्याचे सामर्थ्य केवळ

सख्यत्त्वातच आहे म्हणून, सख्यत्त्व लाभावे म्हणून ते लाभू शकण्याच्या बाबतीत ज्यातून संधी उपलब्ध होऊ शकते, त्याचाच विचार करायला हवा. हा विचार करतानाच लक्षात येऊ शकेल की, राज्यघटनात्मक राजकीय व्यवस्थेची मर्यादा कशी व किती उपयोगी असते, उपयोगी असूच शकणार असल्यास ते कसे व कितपत असू शकेल, हे तर पहायलाच हवे. पण, उपयोगी असूच शकणार नसल्यास ते का व कसे हे देखील पहायलाच हवे! राज्यघटनात्मक राजकीय व्यवस्था मर्यादित व मर्यादेतीलच असते. कारण, ती अमर्याद असली तर व्यवस्थेचे स्वरूप एका प्रकारचे होत असते व मर्यादित असल्यास त्याहून वेगळ्या स्वरूपाचे होत असते. तेव्हा, या बाबतीत राज्यघटनात्मक स्वरूप सोयीचे मानूनच जेव्हा स्वीकारले जाते, तेव्हा ते अपरिहार्य असत नाही. या अर्मादितपणात राज्यघटनात्मक राजकीय व्यवस्था लोकाभिमुख असण्याची शक्यताच नसते.

तेव्हा कायदा, शस्त्र व सैनिक बळावरची अशी व्यवस्था म्हणजेच एकाधिकारशाहीची किंवा हुकूमशाहीची व्यवस्था होऊन बसणेच स्वाभाविक व अपरिहार्य होऊन बसते. म्हणून, लोकांचे शोषण करणेच अशा व्यवस्थेचा संस्कार होऊन बसतो व दीर्घकाळ टिकतो. तेव्हा, शोषण सोसण्याचाच लोकांचा स्वभाव होऊन ही बसतो! म्हणूनच स्वातंत्र्यापासून वंचित राहण्याची वस्तुस्थिती यातूनच निर्माण होत ही असते. तेव्हा, राज्यघटनात्मक राजकीय व्यवस्था ही सोयीची मानूनच जेव्हा स्वीकारायची असते तेव्हा त्यातून असा एक समज बाळगला जातो की, कोणतीही राजकीय व्यवस्था लोकांच्या स्वातंत्र्याचे अपहरण करूनच शोषणकारी होऊच नये! पण, स्वातंत्र्याचे अपहरण करणा-या अशा राजकीय व्यवस्थेवरच अवलंबून वा विसंबून राहण्याची स्थिती जेव्हा निर्माण होत असते, तेव्हा त्यातून स्वातंत्र्य बाधित होऊनच पारतंत्र्याच्या शोषणाला संधी उपलब्ध झाली, असेच म्हणायला हवे असते! अर्थात, सोय मानूनच जेव्हा राज्यघटनात्मक राजकीय व्यवस्था ही व्यक्तिंच्या व पर्यायाने लोकांच्या अभिमुखच रहावयाला हवी, जेणे करून ती शोषण करण्यातून अस्तित्वात येणा-या पारतंत्र्याची होऊच नये! असाच याचा दृष्टिकोन असतो व आहे. पण, राज्यघटनात्मक राजकीय व्यवस्थेवर विसंबून व अवलंबून राहण्याचीच स्थिती जेव्हा निर्माण होत असते, तेव्हा त्यातून स्वातंत्र्याची आकांक्षा करपून जाण्याचीच शक्यता असते व ती दृढही होत जाते! म्हणूनच राज्यघटनात्मक राजकीय व्यवस्थेचा स्वीकार करताना तिच्यावरच अवलंबून रहावे लागू नये, अशी एक मनोधारणा निर्माण व्हावी लागते व तीच स्वातंत्र्याला पोषक असल्यामुळे यातूनच सामाजिक स्वातंत्र्याला संधी ही निर्माण होतच असते! राज्यघटनात्मक राजकीय व्यवस्थेच्या निरपेक्ष भावभावनांची वाढ स्वातंत्र्याच्या आस्थेतूनच करावयाची असते. याचीच वैचारिकता मनात भिनवायला हवी. हेंच नेमके शक्य होताना दिसत नाही. राज्यघटनात्मक राजकीय व्यवस्थेत गुरफटत जाऊन स्वातंत्र्याची अभिव्यक्ती होण्याची शक्यता यामुळेच दुरावत जाते आहे व 'अभिव्यक्तीचे स्वातंत्र्य' किंवा 'व्यक्ति-स्वातंत्र्य' अशी सर्वच स्वातंत्र्याची रूपे काळवंडून विद्रूप होताना दिसत आहेत! म्हणून, विचार करण्याची दिशा जी 'अभिव्यक्ती स्वातंत्र्या'पुरतीच करून घेतली जाते आहे, त्यात योग्य तोच बदल करून निव्वळ स्वातंत्र्याचीच अभिव्यक्ती कशी करता येऊ शकेल याचीच दिशा धरावी ही लागेल! कारण, हीच सकारात्मक दिशा म्हटली जाऊ शकेल. 'अभिव्यक्तीचे स्वातंत्र्य' ही संकल्पनाच मुळात नकारात्मक आहे, हे जाणून घ्यावे लागेलच! अर्थात, स्वातंत्र्याचा विषय जाणीवपूर्वक हाताळताना 'अभिव्यक्तीचे स्वातंत्र्य' या नकारात्मकतेतून 'स्वातंत्र्याची अभिव्यक्ती' या सकारात्मकतेकडेच वळण्याची गरज निर्माण झाली आहे. याच दृष्टीने या पुढचा विचार करायला हवा!

**७) उपसंहार** :

अभिव्यक्ती स्वातंत्र्याच्या संकल्पनेत स्वातंत्र्यामुळेच येणा-या कर्तव्यांचे भान ठेवण्याची इच्छा-आकांक्षा व अपेक्षा नसते व नसूच शकते! म्हणूनच ही संकल्पना नकारात्मक म्हणायला हवी. अर्थात, 'स्वातंत्र्याची अभिव्यक्ती' या संकल्पनेत मात्र स्वातंत्र्यामुळेच प्राप्त होणा-या जबाबदा-या व कर्तव्यांचे भान ठेवणे क्रमप्राप्त व्हावे ही लागते. हाच या दोहोतला फरक आहे व तो मूलभूत स्वरूपाचाच म्हणून मौलिक फरक म्हणायला

ही हवा! तात्पर्य असे कि, नकारात्मकतेत स्वातंत्र्याची आस्था दुर्लक्षित होत असते व सकारात्मकतेत केवळ स्वातंत्र्याची आस्था लक्षित होत ही असते!

❖❖❖



अनुक्रमणिका

पुस्तक परीक्षण :

# 'ज्ञानरचनावादा'चे यथार्थ दर्शन

पंडितराव शा. पवार

'ज्ञानरचनावाद' हा प्राचार्य श्री. शिवाजी राऊत यांची शिक्षणविषयक विचार व्यक्त करणारा मौलिक ग्रंथ नुकताच प्रकाशित झाला आहे. बालक, पालक, शिक्षक आणि चालक हे चार घटक शिक्षण प्रक्रियेत प्रमुख आहेत. यापैकी पहिल्यातीन घटकांवर प्रत्यक्ष आणि चालक (संस्थांचालक) या घटकावर ओघाओघाने लेखकाने आपले विचार मांडले आहेत. माहितीचे कॅटलॉगिंग, लेखन एक तिहेरी प्रक्रिया, भाषिक पर्यावरण, अक्षरमैत्री आणि तर्कसंगत विचार हे विषय या ग्रंथाचा गाभा म्हणता येईल.

शिक्षण प्रक्रियेस अभ्यासक्रम, अध्यापन, अध्ययन आणि मूल्यमापन या चार घटकांना अनन्य साधारण असे महत्त्व आहे. पण आज या चारही घटकांना स्पर्धेच्या युगात व्यावहारिक आणि रूक्ष स्वरूप प्राप्त झाले आहे, ही वस्तुस्थिती आहे. वास्तविक अभ्यासक्रम या शब्दाचा मूळ अर्थ 'क्रिडांगणावरील स्पर्धा' ही स्पर्धा निकोपपणे जिंकण्याचे कौशल्ये शिक्षकाने समरसून देऊन आपला विद्यार्थी क्रीडांगणावरच नव्हे, तर जागतिक स्पर्धेत आणि जीवनाच्या स्पर्धेत यशस्वी झाला, तर त्याचे यथार्थ मूल्यमापन झाले असे म्हणता येईल. पण आज शिक्षकांचे लक्ष प्रमुख्याने विद्यार्थ्यांचा सर्वांगीण (आकारिक) विकास साधण्याऐवजी वेळेत अभ्यास पूर्ण करण्यावर असते. त्यातून विद्यार्थ्यांऐवजी परिक्षार्थी तयार होतो. विद्यार्थ्यांची स्वाभाविकपणे ज्ञानग्रहण करण्याची प्रक्रिया मागे पडून तो परिक्षेत 'घोका आणि ओका' - या चक्रातून बाहेर पडत नाही. लेखकाच्या शिक्षण क्षेत्रातील प्रदीर्घ अनुभवातून हे सत्य त्यांनी उघड्या डोळ्यांनी पाहिले. यातून सुटका होण्यासाठी लेखकाने या ग्रंथात प्रामुख्याने वय वर्षे पाच ते सोळा या गटातील विद्यार्थी आणि त्यांचे शिक्षक विचारात घेऊन ज्ञानरचनावादाचे दिग्दर्शन अत्यंत सोप्या भाषेत केले आहे.

युनेस्को या जागतिक संघटनेने शिक्षणाचे चार स्तंभ किंवा माणके सांगितली आहेत. (१) जाणून घेण्यासाठी शिक्षण (२) कृतिशील शिक्षण (३) सहकार्यातून (Learning to live together) आणि (४) 'स्व'साठी शिक्षण.

या चारही स्तंभाकडे आपल्या शिक्षणपद्धतीत दुर्लक्ष झाले. त्या त्या शासनकर्त्यांची बदलती धोरणे ही त्याला कारणीभूत आहेत. त्याचा अपरिहार्य परिणाम म्हणजे अप्रगत विचारसरणीचा विद्यार्थी समाजात येत राहिल. यामुळं तो परावलंबी संकुचित आणि केवळ परिक्षार्थी झाला. 'स्व' ओळख यापासून तो लांब राहिल्याने तो सर्वांगीण विकासापासूनही दुरावला. कृतीशीलता ही परिस्थिती दूर करण्यासाठी ज्ञानरचनावाद आणि आकारिक विकासासाठी सर्वंकष-सातत्यपूर्ण मूल्यमापन या पद्धतीचा अवलंब नव्याने सुरू झाला. 'ज्ञानरचनावाद' या ग्रंथाच्या मुळाशी ही पार्श्वभूमी आहे. त्यादृष्टीने लेखकाने आपल्या विचार आणि अनुभवांची मांडणी येथे केली आहे.

ज्ञानरचनावाद हे शिक्षणासंबंधीचे आणि शिकविण्यासंबंधीचे एक विधायक तत्त्वज्ञान आहे. त्यात विद्यार्थी घडविणे, त्याला स्वावलंबी करणे हे तसे म्हटले तर अवघड आहे. कारण विद्यार्थ्यांची उपजत जिज्ञासा ज्ञानलालसा ओळखून त्याच्याशी एकरूप होणे हे शिक्षकाचे कौशल्य आहे. त्यासाठी शिक्षकाला आपले ज्ञान अद्ययावत ठेवून गतिमान राहणे, ही येथे पूर्वअट आहे. विद्यार्थ्यांला अभ्यास संपल्यावर गृहपाठ देण्याइतकी ही प्रक्रिया सोपी नाही. विद्यार्थ्यांचे पूर्वज्ञान, विषयासंबंधीच्या नवनवीन कल्पना, त्यातून प्राप्त होणारे विचार, त्याचे आकलन, त्यातून कृतीही ज्ञान मिळविण्याची प्रक्रिया आहे. त्यासाठी शिक्षकाला आपल्या भोवतालचे सामाजिक वातवरण विद्यार्थ्यांची कौटुंबिक आर्थिक परिस्थिती, त्याची भाषायांचे ज्ञान करून घेऊन त्याचा आकारिक विकास साधायचा असतो. त्यासाठी त्याचे विविध पातळ्यांवर सर्वंकष मूल्यमापन अपेक्षित आहे. म्हणून येथे विद्यार्थी आणि

अनुक्रमणिका

शिक्षक यांचा समन्वय, पालकांचे सहकार्य महत्त्वाचे आहे, ही अपेक्षा लेखकाने पानोपानी सांगितली आहे. विद्यार्थी आणि पालक यांचेशी चांगला समन्वय ठेवण्यासाठी शिक्षकाला आपली मानसिकता बदलावी आता लागेल. त्यासाठी प्रगत अध्यापन साधनांचा व्यासंग वाढवावा लागेल हेही येथे महत्त्वाचे आहे.

'ज्ञानरचनावाद' या ग्रंथात आपल्या प्रदीर्घ अनुभवाच्या आधारावर 'बालक, पालक आणि शिक्षक' या प्रमुख घटकांना समोर ठेवून प्रत्येकाच्या भूमिकेसंबंधी जबाबदारी स्पष्ट करण्यासाठी प्रत्येकी नऊ उपविषय घेऊन आपल्या विषयाचा परिपाठ केला आहे. बालकासंबंधी लिहिताना लेखकाने मुले स्वाभाविकपणे शिकतात. अशावेळी त्यांची जिज्ञासा, अस्मिता मरता कामा नये, ही काळजी शिक्षक, पालक यांनी घेतली पाहिजे हा विचार महत्त्वाचा आहे. खेळ, वाचन, लेखन, बोलणे त्यातून हळूहळू विचार करणे, त्याच्या बोली भाषेला प्रोत्साहन देणे इत्यादी स्वाभाविक बाबींचा जाणिवपूर्वक विचार शिक्षकांनी करावा ही विकासात्मक प्रक्रिया महत्त्वाची आहे.

बालकाच्या मेंदूच्या विकासानुसार त्याची ज्ञानग्रहणाची प्रक्रिया विकसित होणे हे आज पालकांनी ध्यानी घेणे आवश्यक आहे. ज्ञान ही आकलन, संबोध, कृती, निर्णयशक्ती, समस्या उकल, नवनिर्मिती, अभिव्यक्ती आणि सुसंगती यांचेशी निगडित असते. ती भूत, वर्तमान आणि भविष्यकाळातील अनुभवाच्या पातळ्यांवर पडताळता येते. यादृष्टीने विद्यार्थी हा ज्ञाननिर्माता असतो, हे लेख काचे म्हणजे यथार्थ आहे. त्यासाठी केवळ माहिती जमा करण्यापेक्षा विद्यार्थ्यांची अनुभव समृद्धी महत्त्वाची असते. त्यासाठी पालक-शिक्षक यांनी सजग राहणे आवश्यक आहे. म्हणून ज्ञानरचनावाद म्हणजे क्षमता अधिष्ठिस अनुभवविध आणि ज्ञानपातळ्या विकसित करण्याचा विद्यार्थ्यांचा स्वंय प्रयत्न होय. त्यात कृतिशिलता गृहीत आहे. त्यासाठी ज्येष्ठांचे मतादर्शन विद्यार्थ्यांना जाणीवपूर्वक मिळवून दिले पाहिजे. परिसरातील घटनांचे निरीक्षण, श्रवण आणि कृती यातून विद्यार्थ्यांने स्व-ओळख करून देणे म्हणजे ज्ञानवाटेतून त्याची आकलनक्षमता विकसित करणे होय. फुरसतीच्या वेळेचा उपयोग विद्यार्थ्यांच्या ज्ञानवृद्धीसाठी क्षमतेने करून घेणे हेही शिक्षक-पालक यांचे कर्तव्य ठरते. बालकास मुक्तपणे शिकण्यासाठी शिस्तीपेक्षा चुका समजावून सांगणे, 'चुका आणि शिका' - तत्त्व मनावर बिंबविणे हाही मानसशास्त्रीय दृष्य शैक्षणिक प्रयोगच आहे. त्यासाठी शिक्षा आणि शिस्त यातील फरक समजावून त्याला कार्यप्रवृत्त करणे आज गरजेचे आहे. आज ज्ञान हे केवळ शाळेतील अभ्यासक्रमातच मिळते असे नसून घर, अंगण, सहल, सार्वजनिक उपक्रम इ. ठिकाणी प्रत्यक्ष अप्रत्यक्ष मिळते. याचे मार्गदर्शन बालकास मिळाले तर तो अधिक सजग होतो. स्वंयम आत्मविश्वास आणि स्वयम् अस्मिता वाढीस लागण्यासाठी तणावरहित चांगले शैक्षणिक वातावरण निर्माण करणे म्हणजे ज्ञानरचनावाद होय. त्यातून स्वयंम् बदलाची क्रिया घडण्यास मदत होते.

शिक्षकांनी आपल्या अध्यापनपद्धतीतून विद्यार्थ्यांस केवळ श्रवण करण्यास प्रवृत्त करण्यापेक्षा कृतिप्रवण केली पाहिजे. त्यातून विद्यार्थ्यांची सर्जनशीलता वाढून स्वनिर्मितीचा आनंद ही त्यास मिळतो. स्मरणशक्तीची परिक्षा घेण्यापेक्षा वाचन, लेखन, भाषण, क्रीडा इ. कौशल्यांची परीक्षा घेण्याचा हा काळ आहे. त्याला जे कळले ते अभिव्यक्त करता आले पाहिजे, येथे शिक्षकांची कसोटी लागते. शब्द, शब्दांचे प्रकार, विचार प्रक्रिया तिचे प्रकटीकरण याचे उपयोजन म्हणजे ज्ञानरचनावाद हे शिक्षकांनी ही आत्मज्ञात केले पाहिजे. जातनिरपेक्ष, धर्मनिरपेक्ष, समतावादी सहिष्णुतेचे वातावरण आणि राष्ट्रीय एकात्मता यांचे महत्त्व शाळेत विविध कार्यक्रमांच्या निमित्ताने विद्यार्थ्यांच्या मनावर बिंबविणे महत्त्वाचे असते. संतांचे विचार-अभंग पाठांतर करण्यापेक्षा त्याच्या व्यक्तिमत्त्वातून ते साकारणे हाही एक भक्तिक्षमता वाढविणारा उपक्रम ठरतो. म्हणून ज्ञानरचनावाद ही विद्यार्थ्यांच्या भवितव्याची अनिवार्यता आहे. त्यात ज्ञाननिर्मिती ही विद्यार्थी केंद्रित आणि समाजविकास केंद्रित अपेक्षित आहे, ही लेखकांची तळमळ लक्षणीय आहे.

या लहानशा ग्रंथात लेखकाने अतिशय लहान-लहान अर्थपूर्ण वाक्येरचना करून आपले म्हणणे मांडले आहे. ज्ञानरचनावादांचे तत्त्वज्ञान सांगण्यासाठी विपुल उदाहरणे

दिली आहेत. काही ठिकाणी 'भक्ती ही एकाग्रता असते.' भक्ती हे स्वतःला विसरणे असते. भक्ती हा संप्रदायाचा आनंद असतो.' किंवा 'ज्ञान ही एक जीवनतृष्णा बनली पाहिजे. ती तृष्णा (ओढा पालक, शिक्षक व बालक) अशी संक्रमीत होणे यासाठी हा सामुहिक शिस्तबद्ध प्रयत्नांची आता गरज निर्माण झाली आहे? किंवा 'महानता हा अभिमान असतो. महानता ही साधना असते. ही ज्ञानप्राप्ती असते. ती तत्त्वशुद्धता असते; अशा विधानातून व्यक्त होणारे विचार लेखकाची चिंतनशिलता आणि जीवननिष्ठा व्यासंगाचा प्रत्यस आणून देते हे या लेखकाचे फार मोठे योगदान म्हणता येईल. वाचन संस्कृतीचा आग्रह आणि थोरांचे आदर्श यावरती लेखकाने भर दिला आहे.'

आजचा विद्यार्थी उद्याच्या भारताचा जबाबदार नागरिक होणार आहे. तो समाजाचा सुधारित संशोधक, शास्त्रज्ञ, शिक्षक इ. होईल त्यासाठी त्याला आपले जीवन कार्यक्षमतेने व यशस्वीपणे जगता यावे यासाठी त्याला वरील ग्रंथात सांगितलेली कौशल्ये आणि क्षमता प्राप्त करणे क्रमप्राप्त आहे. आपल्या भौतिक आणि मानसिक क्षमतांचा विकास म्हणजेच व्यक्तिमत्त्वाचा विकास होय. यालाच वेगळ्या शब्दात ज्ञानरचनावाद म्हणता येईल. जागतिक आरोग्य संघटनेने देखील खालीलप्रमाणे जीवनकौशल्ये पुरस्कृत केली आहेत. उदा., स्वजागृती, सहानुभूती, समस्यानिवारण, प्रभावी संवाद, निर्णयक्षमता वाढविणे, सर्जनशील विचार प्रक्रिया, चिकित्सक विचार प्रक्रिया, भावनांचे समायोजन, ताणतणावांचे समायोजन इत्यादी जीवन कौशल्ये अध्यापन करताना शिक्षकाने विद्यार्थ्यास प्राप्त देणे आज गरजेचे आहे. हीच जीवनकौशल्ये लेखकाने वेगळ्या शब्दात येथे सांगितली आहेत असे मला वाटते.

लेखकाने ग्रंथांची मांडणी आकर्षक पद्धतीने केली आहे. प्रत्येक लेखांच्या सुरुवातीला नामवंत शिक्षणतज्ज्ञाचे छायाचित्र छापले आहे त्यामुळे दृश्यमूल्य वाढले. त्या खाली लेखाच्या आशयाशी अन्वर्यक असे शीर्षक देऊन चौकटीतले खालील महत्त्वाचे विचार सारांश रूपाने दिले आहेत.लेखाच्या शेवटी शिक्षण प्रक्रियेशी निगडित महत्त्वाचे विचार दिले आहेत. त्यामुळे ग्रंथाचे आंतरबाह्य स्वरूप आकर्षक आणि संदर्भमूल्य देणारे झाले आहे. प्राचार्य शिवाजी राऊत यांनी हा ग्रंथ लिहून शैक्षणिक क्षेत्रात फार मोलाची भर घातली आहे, असे म्हटले तर वावगे नाही.

❖❖❖

पुस्तक परीक्षण :

# ‘पुस्तकाच्या गावा जावे.......’

संग्राम थोरात

आचार्य अंत्र्यांनी आपल्या ‘क-हेचे पाणी’ या आत्मचरित्रात असे म्हटले आहे की, ‘भारतात ज्याला इतिहास आहे असे एकच राष्ट्र आहे आणि ते म्हणजे महाराष्ट्र.’ संयुक्त महाराष्ट्राच्या लढ्यात सक्रिय असणारे अत्रे महाराष्ट्राविषयी सार्थ अभिमानाने म्हणत असत की, ‘दुर्लभं भारते जन्म, महाराष्ट्रे त्वतिदुर्लभम्’ या राज्यातील माझा जिल्हा म्हणजे मर्द मावळ्यांचा सातारा! माझ्या शिवबाचा सातारा! सप्तता-यांचा सातारा! मराठ्यांची दुसरी गादी सांभाळणारा सातारा! यशवंत-रावांचा सातारा! कर्मवीरांचा सातारा! क्रांतिवीरांचा सातारा! कृष्णा-कोयनेचा सातारा! समर्थांच्या व संतांच्या आध्यात्माचा सातारा! निसर्गाचा हिरवा शालू परिधान केलेला सातारा! तुमचा आमचा सगळयांचा सातारा आणि आता पुस्तकाच्या गावाचा जिल्हा सातारा असा सातारा जिल्ह्याला मान मिळाला आहे. महाराष्ट्र शासनाच्या पुस्तकाचे गाव या प्रकल्पासाठी सातारा जिल्ह्यातील महाबळेश्वर तालुक्यातील भिलार हे गाव निवडण्यात आले आणि हे जगातील दुसरं व देशातीलं पहिलं पुस्तकाचं गावं ठरलं. या गावाला भेट देण्याचा योग ०४ मे २०१७ रोजी आला त्यानिमित्त..........’

‘पुस्तकांचं गावं’ खरतरं खूपच अभिनव आणि वेगळी कल्पना. माझं गाव वाई तालुक्यातील अमृतवाडी या गावातून निघून पाचवड फाट्यावरील राष्ट्रीय महामार्ग क्र. ४ (मुंबई ते बेंगलोर)ला लागताच ‘पुस्तकांचं गावं भिलार आपली वाट पाहतय.....’ असे फलक आपलं लक्ष्य वेधून घेतात. त्यामुळे आपण आपोआपच त्या गावाकडे खेचले जातो. इथे येणारा पर्यटक वाचन संस्कृतीशी जोडला जावा या हेतूने गाव सज्ज झाले आहे. भिलार गावातील २५ घरं या उपक्रमासाठी निवडली आहेत. ती घरं आता ग्रंथालयं बनली आहेत. गावातील अंतर्गत रस्त्यांवरही फलक लावून कोणते साहित्य कुठे आहे हे दर्शविले आहे. कथा, कादंबरीपासून ते बालसाहित्य, ललित, ऐतिहासिक, शिवकालीन इतिहास व गडकिल्ले, पर्यावरण, स्त्री-साहित्य, संतसाहित्य, चरित्र-आत्मचरित्र, विनोदी, परिवर्तनवादी चळवळीचे साहित्य, नियतकालिके, विज्ञान, दिवाळी अंक, कविता अशा विविध विषयांच्या दालनांत त्या त्या विषयांची पुस्तके वाचकांची वाट पाहत आहेत. सध्याची पुस्तकांची संख्या सुमारे १५ हजार असली तरी ती पुढे वाढवली जाणार आहे. गावातील प्रत्येक घर वेगळ्या पद्धतीने रंगवलेलं आहे. संतसाहित्याचे दालन मंदिरात ठेवले असून ज्ञानेश्वरादी संतांची सचित्र वचने लिहिलेली आहेत. गावात प्रवेश करताच प्रकल्प नकाशा हातात मिळाल्याने कुठे, कोणती पुस्तके ठेवलीत ते समजते. त्यामुळे ज्याला ज्या विषयांत गोडी आहे, ती पुस्तके त्याला एकाच ठिकाणी मिळणार असल्याने त्याचे पाय आपोआप तिकडे वळतात. विशिष्ट विषयांच्या अभ्यासकांसाठी व संशोधकांसाठी, तर ही पर्वणीच आहे.

‘आम्हां घरी धन, शब्दांचीच रत्ने’ असे संत तुकारामांनी म्हटले, ‘दिसामाजी काहितरी ते लिहावे प्रसंगी अखंडीत वाचित जावे’ असे संत रामदासांनी सांगितले. ‘वाचाल तर वाचाल’ या विषयावर तर प्रत्येकानेच विद्यार्थीदशेत निबंध लेखन किंवा भाषण केले असेल. यातून लेखनाचं, वाचनाचं व पुस्तकांचं महत्त्व अधोरेखित होते. ई-लर्निंगच्या माध्यमातून वाचणा-या तरुणाईला हातात पुस्तक घेऊन वाचनाची गोडी लागायला हवी. महाबळेश्वर व पाचगणीला फिरायला गेल्यावर फिरून थकल्यावर वरील गावात जावून शब्दसरितेत डुंबून जावे. वाचन एवढे अंगवळणी पडावे की, भिलारला आलो आहोत, तर चला पर्यटनही करूयात असं व्हायला हवं. स्ट्रॉबेरीचं गावं अशी जुनी ओळख असणारे भिलार आता निसर्गसंपदा आणि स्ट्रॉबेरीच्या गोडीबरोबरच

वाचनाची गोडी निर्माण करण्यात महत्त्वाची भूमिका बजावणार आहे यात शंका नाही.

दक्षिण काशी म्हणून प्रख्यात असणा-या वाईपासून पसरणी घाटातून घाटमाथ्यावर गेले की, पाचगणी व महाबळेश्वर ही थंड हवेची ठिकाणं लागतात. पाचगणीपासून महाबळेश्वरकडे जाताना अवघ्या ५ ते ७ किलोमीटरच्या अंतरावर भिलार हे गाव डोंगराच्या कुशीत व निसर्गाच्या मुशीत; खुशीत वसलेले आहे. वर्षभरातील कोणत्याही दिवशी गेलं तरी हे गाव मनाला आनंदच देतं. गेली कित्येक वर्ष इथे स्ट्रॉबेरी महोत्सवही भरतो. शेतावर जाऊन स्ट्रॉबेरी खाण्याची मुभा या गावाने पर्यटकांना दिली आहे. या स्ट्रॉबेरीनं देशातीलच नव्हे तर परदेशातील ही पर्यटकांना अक्षरशः वेडं केलं. पर्यटनासाठी आलेला पर्यटक स्ट्रॉबेरीची चव चाखणारं नाही असे कधी झाले नाही व भविष्यात कधीच होणार नाही. भिलार आणि स्ट्रॉबेरीचं असं घट्ट नातं आहे. या फळाविषयी ग्रामस्थ म्हणतात, 'महाबळेश्वर तालुका स्ट्रॉबेरीचे जन्मग्रामः ब्रिटिशांनी १९३८ मध्ये स्ट्रॉबेरीच्या रोपांची लागवड केली याकरिता माऊंट माल्कम यांनी पहिलं पाऊल उचललं. त्यानंतर स्वातंत्र्य मिळाले. रोपे वाढत गेली. १९५२-५३ च्या दरम्यान स्थानिक शेतक-यांनी हे पिक घेण्यास सुरुवात केली. तब्बल चाळीस वर्षं शेतक-यांनी निग्रो, ऑस्ट्रीया, बंगलोर या जातीच्या स्ट्रॉबेरीची लागवड केली. निमुळता आकार त्यावर नक्षाकार टिपक्या चविष्ट जिभेवर रेंगाळणा-या या जातीची स्ट्रॉबेरी होती.' पुढे याच्यात अनेक जाती निर्माण झाल्या. सातारा जिल्ह्यातील इतर तालुक्यांतही हे पिक यायला लागले पण पाचगणी व महाबळेश्वरच्या थंड हवेच्या ठिकाणची स्ट्रॉबेरीची गोडी औरच हे मान्य करावेच लागते. स्ट्रॉबेरीमधील स्वीट चार्ली ही सर्वात गोड मानली जाते. या स्वीट चार्ली प्रमाणेच या गावातील लोकही मला गोड वाटले. थोडे राजकारणमध्ये आल्यामुळे वातावरण 'आंबट' झाले होते; पण ते वेळीच सावरल्यामुळे वातावरण पुनःश्च 'गोड' झाले. या गोडीत वाचनाची गोडी मिसळल्याने स्ट्रॉबेरीच्या स्वादाबरोबरच नव्या पुस्तकांचा सुगंधही एकरूप झाला.

आमच्या सातारा जिल्ह्याला हा अनोखा व अभिनव उपक्रम मिळाला आहे. किमान आम्ही सातारकरांनी तरी याचा जाणीवपूर्वक फायदा घेतला पाहिजे. 'देव आला द्यायला अन् झोळी नाही घ्यायला' असं व्हायला नको. पुस्तकांचं साक्षात भांडार आपल्यासाठी खुलं झालं आहे. आपणाला कुटुंबासह, मित्रांबरोबर जाता येईल तसेच शाळा कॉलेजची सहलही घेऊन जाता येईल. एकंदर काय, तर नव्या पिढीला सुजाण नागरिक बनवायचं असेल, तर अशा उपक्रमांना भेट द्यायलाच हवी. बरं हे सगळं केवढं सोपं आणि सुलभ आहे बघा. गावात कुठे शिवरायांचं भित्तीचित्र, तर कुठे बालसाहित्याचे फलक, कुठे संतसाहित्याचा वसा, तर कुठे स्त्री मनाची स्पंदने रेखाटणारी चित्रे, तर कुठे दिवाळी अंकांची मेजवानी. ज्या घराबाहेर जे चित्र त्या विषयाची पुस्तके त्या घरात असे सोपे समीकरण. 'आमच्या घरी या स्ट्रॉबेरी चाखा व पुस्तके वाचा' असे आवाहन ग्रामस्थ करीत वाचन संस्कृतीचं संवर्धन करण्यासाठी सज्ज झाले आहेत. ही ज्ञानाची सफर करताना एक उणीव मात्र जाणवली ती म्हणजे स्पर्धा परिक्षेच्या पुस्तकांचे दालन कुठेच दिसले नाही किंवा ते असेल पण आम्ही तिथे पोचलो नसेल असेही झाले असावे. एकंदर मतितार्थ काय तर ज्ञानाचा सागर आपली वाट पाहतोय, त्याचा पुरेपुर लाभ घेऊयात म्हणजे पुढे बा. सी. मर्ढेकर यांचे मर्ढे हे गाव आपल्याला 'कवितेचं गावं' व सातारा जिल्हा 'साहित्याचा जिल्हा' बनविता येईल. किसन वीर महाविद्यालयातील माझ्याच मराठी विभागातील कै. प्रा. डॉ. शिवाजीराव चव्हाण यांनी साता-याला ग्रंथ महोत्सव चालू केला. अशी ही उपक्रमशील भूमी आहे. त्यामुळे अशा ज्ञान पंढरीला भेट द्यायलाच हवी. मी तर जाऊन आलोय. माझ्याबरोबर माझा मुलगा चि. समर्थ, किसन वीर महाविद्यालयाचे ग्रंथपाल प्रा. शिवाजी कांबळे, सहाय्यक ग्रंथपाल श्री. धनाजी जाधव, ग्रंथालय लिपिक श्री. बी. ए. टेमकर होते. आता बोला तुम्ही कधी जाणार..... शेवटी एवढचं म्हणेन 'जावे पुस्तकाच्या गावा, तेथे ज्ञानमेवा खावा.'

**संदर्भ टीप :-**

१) साप्ताहिक कृष्णकुंज : संपादक सचिन भिलारे, शुक्रवार दि. ३० एप्रिल ते ०४ मे २०१७.

❖❖❖

## जुने लेखन

### इंग्रजी आणि मराठी

मर्यादित अर्थाने का होईना, पण आज इंग्रजी ही 'पाश्चात्त्य जगा'ची ज्ञानभाषा आहे. हा मर्यादित अर्थ असा, की ज्ञानाच्या, विशेषतः वैज्ञानिक ज्ञानाच्या आदान-प्रदानाचे, पाश्चात्त्य जगाच्या संदर्भात इंग्रजी हे प्रमुख, जवळजवळ एकमेव असे भाषिक माध्यम आहे. एक तर वैज्ञानिक ज्ञानाची वाढ एवढ्या सातत्याने आणि झपाट्याने होत आहे, की स्वतःच्या ज्ञानक्षेत्रात पडत जाणारी जी भर तिच्याशी सतत संपर्क राखणे हे वैज्ञानिकाला अत्यावश्यक झाले आहे. आपण घातलेली भर सहवैज्ञानिकांच्या ध्यानी तात्काळ आणून देणे आवश्यक असते. नाही तर आपले श्रेय दुसरा कुणी बळकावून बसेल. शिवाय जे दुस-याने अगोदरच शोधून काढले आहे त्याचा परत शोध लावण्यात काही हशील नसते. तेव्हा स्वतःच्या वैज्ञानिक क्षेत्रात आघाडीवर असलेल्या, म्हणजे त्याच्यात नवीन भर घालण्याची कुवत असलेल्या, प्रत्येक वैज्ञानिकाला आपल्या विशिष्ट क्षेत्रात नवीन काय घडत आहे ह्याची सतत देखल घेत राहणे अत्यावश्यक झाले आहे. ह्यामुळे एका भाषेद्वारा हे आदान-प्रदान होणे वैज्ञानिक परिवाराच्या दृष्टीने सोयीचे ठरले आहे आणि ही भाषा आज पाश्चात्त्य जगाच्या संदर्भात इंग्रजी आहे.

हा वैज्ञानिक परिवार बहुभाषिक आहे. म्हणजे त्याच्यात विविधभाषी लोक आहेत. फ्रेंच, जर्मन, इटालियन, स्वीडिश, स्पॅनिश इ. भाषा बोलणा-या वैज्ञानिकांचा तो समूह आहे. जर्मन वैज्ञानिक आपले शोध लावताना जर्मन भाषेचा वापर करील, पण ते लागल्यानंतर ते इंग्रजीतून प्रसिद्ध करील असा वरील म्हणण्याचा अर्थ नाही. आपल्या ज्ञानशाखेतील पुरेसे जाणकार जर जर्मन भाषिक असले, तर तो आपले शोध जर्मन भाषेत प्रसिद्ध करील पण त्याबरोबरच इंग्रजीतून त्यांचे सार प्रसिद्ध होईल ही खबरदारीही तो घेईल. डच किंवा स्वीडिश यांसारख्या लहान भाषिक गटाचा वैज्ञानिक कदाचित आपले शोध सरळ इंग्रजीतून प्रसिद्ध करणे पसंत करील. या संबंधात आणखी एक गोष्ट ध्यानात घेतली पाहिजे. विज्ञानात आणि तंत्रज्ञानात इतके आत्यंतिक विशेषीकरण (स्पेशलायझेशन) झाले आहे, की विशिष्ट ज्ञानशाखेच्या आघाडीवर असलेले वैज्ञानिक संख्येने अतिशय मर्यादित असतात. ह्या लहान पण बहुभाषिक समूहासाठी त्यांच्या ज्ञानशाखेला वाहिलेले नियतकालिक किवा ग्रंथ – तिच्यातील चालू घडामोर्डींची माहिती करून देणारे नियतकालिक, किंवा त्या विषयाची अद्ययावत मांडणी करणारे ग्रंथ–एका समान भाषेतून प्रसिद्ध होणे आर्थिकदृष्ट्या लाभदायक ठरते. ही समान भाषा आजच्या परिस्थितीत अटळपणे इंग्रजी आहे.

आजच्या जगात इंग्लंडचे राजकीय, आर्थिक किंवा सांस्कृतिक वर्चस्व आहे आणि म्हणून ही भाषा इंग्रजी आहे असे नव्हे. ती इंग्रजी असण्याचे कारण अमेरिकेच्या आर्थिक तंत्रज्ञानात्मक सामर्थ्यात आहे. वैज्ञानिक आणि तंत्रज्ञानात्मक संशोधन संघटित करण्यासाठी जो प्रचंड पैसा खर्च करावा लागतो, तो अमेरिकेला जितक्या सुलभतेने करता येतो तितक्या सुलभतेने लहान देशांना करता येत नाही. एकोणिसाव्या शतकाशी तुलना करता हा एक महत्त्वाचा फरक ध्यानात येतो. एकोणिसाव्या शतकात विज्ञान हे भाषिक किंवा राष्ट्रीयदृष्ट्या पाहता बहुकेंद्री होते. इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी, इटली, अमेरिका, इ. देश सर्वसाधारणपणे एका पातळीवर, थोड्या प्रमाणात पुढे-मागे होते. इंग्लंडचा व्यापार, त्यांतून उद्‌भवलेले साम्राज्य आणि औद्योगीकरणाला इंग्लंडमध्ये अगोदर झालेली सुरुवात यामुळे इंग्लंड जरी काहीसे अग्रेसर होते तरी समान दर्जाच्या अनेकांमधील ते पुढारीपण होते आणि एकोणिसावे शतक ओसरताना या देशांमधील कोणता देश, कोणत्या क्षेत्रात, कोणाच्या पुढे आहे हे सांगणे कठीण झाले असते. राजकीय क्षेत्रात 'अतिसत्ता' (सुपरपॉवर) ही संकल्पना आणि वस्तुस्थिती अवतरली

नव्हती आणि वैज्ञानिक क्षेत्रात तर नव्हतीच नव्हती.

ह्यामुळे विज्ञानही बहुभाषिक होते. एकमेकांशी संपर्क ठेवण्यासाठी वैज्ञानिकांना बहुभाषिक असावे लागत होते आणि त्याबरोबर वैज्ञानिक ग्रंथांची व निबंधांची भाषांतरे पद्धतशीरपणे करणारी यंत्रणा संघटित करणे भाग पडत होते. आज अमेरिका ही अतिसत्ता आहे. ज्या आर्थिक आणि तंत्रज्ञानात्मक सामर्थ्याच्या पायावर अतिसत्ता उभी राहू शकते, तो पाया प्रगत विज्ञानाने रचला आहे आणि प्रगत विज्ञानात (आणि त्यावर आधारलेल्या तंत्रज्ञानात) सतत आघाडीवर राहणे हे अतिसत्तेला, आपले अस्तित्त्व टिकवून धरण्यासाठी, अत्यावश्यक असते. रोमन सत्ता हीसुद्धा ज्या रानटी टोळ्यांपुढे किंवा लहान लोकसमूहांपुढे उभी ठाकत असे, त्यांच्या तुलनेने अतिसत्ता होती. पण रोमन सत्तेचे हे स्वरूप तिच्या लष्करी आणि शासकीय संघटन करण्याच्या कौशल्यावर आधारलेले होते. वैज्ञानिक प्रगतीवर ते आधारलेले नव्हते. आजची अतिसत्ता वैज्ञानिक-तांत्रिक सामर्थ्य आणि आर्थिक सामर्थ्याच्या पायावर उभी राहिली आहे. वैज्ञानिक-तांत्रिक सामर्थ्य आणि आर्थिक सामर्थ्य हे एक सुष्ट चक्र आहे. ही दोन प्रकारची सामर्थ्ये एकमेकांच्या अस्तित्वाच्या अटी आहेत आणि ती एकमेकांचे पोषणहि करतात. आर्थिक सामर्थ्याच्या बळावर वैज्ञानिक-तांत्रिक संशोधन आवश्यक त्या पद्धतीने संघटित करता येते आणि ह्या संशोधनाचे फळ आर्थिक भरभराटीच्या स्वरूपात पदरात पडते. ह्या अतिसत्तेची भाषा, सर्वांत मोठ्या प्रमाणावर वैज्ञानिक-तांत्रिक संशोधन संघटित करणा-या, अनेक देशांतील श्रेष्ठ वैज्ञानिकांना एकत्र आणून, त्यांना आवश्यक ती सर्व उपकरणे व सोयी उपलब्ध करून देऊन संशोधन संघटित करणा-या, ह्या संशोधकांकरवी आपल्या तरुणांचे प्रशिक्षण करवून संशोधनाला सातत्य प्राप्त करून देणा-या अतिसत्तेची भाषा ही वैज्ञानिक ज्ञानाच्या आदान-प्रदानाची भाषा होणे स्वाभाविक आहे.

ह्या अतिसत्तेचे स्वरूप समानांमधील प्रथम असेच आहे हेही ध्यानात घेतले पाहिजे. हे तिचे स्वरूप अर्थात पाश्चात्त्य राष्ट्रांच्या संबंधात आहे. इंग्लंड किंवा फ्रान्स किंवा प. जर्मनी हे देश वैज्ञानिक-तांत्रिक प्रगतीच्या बाबतीत अमेरिकेच्या तोडीचे आहेत. जर समजा दुसरी अतिसत्ता, सोव्हिएट रशिया, नसती, तिच्यापासून स्वतःचे संरक्षण करण्याची समस्या ह्या देशापुढे उभी नसती तर अतिसत्ता हे स्वरूपही अमेरिकेला प्राप्त झाले नसते. प्रचंड लष्करी सामर्थ्य अमेरिकेला कमवावे लागले नसते. लष्करी सामर्थ्य उभारण्याची निकडीची गरज नसती, तर कदाचित् युद्धोत्तर कालात ज्या झपाट्याने वैज्ञानिक प्रगती झाली आहे तितकी ती झालीही नसती. अमेरिकेला पाश्चात्त्य जगाचे आज जे नेतृत्व लाभले आहे ते लाभले नसते. तरीही एकंदरीत आर्थिक सामर्थ्यामुळे अमेरिका विज्ञानात अग्रेसर राहिली असती आणि अमेरिका आणि इंग्लंड यांच्या संयुक्त प्रभावामुळे इंग्रजीही वैज्ञानिक ज्ञानाच्या आदान-प्रदानाची समान भाषा म्हणून पाश्चात्त्य जगात मान्यता पावली असती.

पाश्चात्त्य राष्ट्रांच्या भाषिक व्यवहाराचे वर्णन थोडक्यात असे करता येईल : आधुनिक ज्ञानाला–वैज्ञानिक आणि मानवी ज्ञानाला–ज्या सांस्कृतिक परिसरात प्रारंभ झाला आणि त्याचा ज्या सांस्कृतिक परिसरात विकास झाला, त्याच्यात अंतर्भूत असलेली ही राष्ट्रे आहेत. ह्यामुळे त्यांच्यामधील लहान राष्ट्रे घेतली– उदा. हॉलंड किंवा नॉर्वे–तरी अत्युच्च पातळीवरील आधुनिक ज्ञान आणि विचार व्यक्त करण्याची शक्ती कमावलेल्या अशा त्यांच्या भाषा आहेत. म्हणून सर्व शास्त्रांचे सर्वोच्च पातळी-पर्यंतचे अध्ययन ह्या भाषांद्वारा होऊ शकते आणि होते. ह्यासाठी आवश्यक असलेला ग्रंथसंभार ह्या भाषांत अस्तित्वात आहे. पूर्ण चोखपणे आणि नेमकेपणे मांडण्यात आलेले अद्ययावत ज्ञान त्यांच्यांतून ह्या भाषिकांना उपलब्ध आहे. म्हणजे ज्ञानाची आणि विचाराची मांडणी करण्याच्या सामर्थ्याच्या दृष्टीने ह्या भाषा, ह्या भाषासमूहातील, प्रमुख भाषेच्या, म्हणजे इंग्रजीच्या तोडीच्या आहेत. ह्याचे आश्चर्य वाटायला नको, कारण एकाच सांस्कृतिक परिसरातील या भाषा आहेत. उदा., ह्या सर्वच भाषांच्या वांशिक नसल्या तरी सांस्कृतिक अभिजात भाषा ग्रीक व लॅटिन याच आहेत. तेव्हा शिक्षणाचे माध्यम म्हणून आणि देशांतर्गत वैचारिक व्यवहाराचे माध्यम म्हणून या भाषा स्वयंपूर्ण आहेत. प्रश्न येतो तो फक्त अतिशय खर्चिक असलेले नवीन ज्ञान निर्माण करण्याच्या, ज्ञानशाखांच्या सीमांवर इतरत्र निर्माण होत असलेले नवीन ज्ञान प्राप्त करून

अनुक्रमणिका

घेण्याच्या आणि आपण लावलेले शोध वैज्ञानिक परिवाराच्या ध्यानी आणून देण्याच्या व्यवहाराच्या संदर्भात त्यांना परभाषेचा आश्रय घ्यावा लागतो. हा प्रश्न आज प्रामुख्याने इंग्रजीचा उपयोग करून सोडविला जातो.

वैज्ञानिक व्यवहार हा केवळ एका प्रकारचा व्यवहार होय. विज्ञानाची भाषा 'वस्तुनिष्ठ' पदार्थांच्या आणि घटनांच्या गुणधर्मांवर बेतलेली असते. विशिष्ट व्यक्तीच्या किंवा समूहाच्या दृष्टिकोणापासून ती शक्य तितकी अलिप्त असते. ललित साहित्याची भाषा विशिष्ट सांस्कृतिक परंपरेने घडविलेल्या समूहातील व्यक्तीचे जीवन व्यक्त करणारी भाषा असते. ह्या समूहाचा इतिहास आणि त्याची समग्र वर्तमान परिस्थिती ह्या परिस्थितीला समूह आणि व्यक्ती देत असणारे प्रतिसाद आणि समूहाच्या सांस्कृतिक परंपरेने घडविलेले त्याचे भाषिक संचित ह्यांच्यापासून ललित साहित्याच्या भाषेला तोडता येत नाही. वैज्ञानिक भाषा आणि ललित साहित्याची भाषा या दोन टोकांमध्ये तत्त्वज्ञान इतिहास, समाजशास्त्र, इ. मानव्य-विद्यांच्या भाषा येतील. पण पाश्चात्त्य राष्ट्रांचा मिळून एका (संमिश्र) सांस्कृतिक परंपरेने घडविलेला समाज बनतो, तेव्हा मानव्यविद्यांच्या संदर्भातसुद्धा ह्या सर्व भाषा एकाच कुटुंबातील भाषा आहेत. एखाद्या भाषेत कोणत्या विषयावर लिहिले जात आहे ह्या प्रश्नाइतकाच ते कोणासाठी, कोणाला उद्देशून लिहिले जात आहे हा प्रश्नही महत्त्वाचा आहे. उदा., नॉर्वेच्या प्राचीन इतिहासात नॉर्वेजिअन लोकांना असेल तितका रस इतरांना असणार नाही. नॉर्वेजिअन इतिहासकाराने नॉर्वेजिअन भाषेत लिहिणे स्वाभाविक ठरेल. पण ख्रिस्ती धर्म शास्त्राच्या इतिहासात किंवा फ्रेंच क्रांतीच्या इतिहासात सर्व युरोपीय आणि बृहत-युरोपीय लोकांना रस असणार. नॉर्वेजिअन इतिहासकाराने नॉर्वेजिअन भाषेत ह्या विषयावर लिहिलेले पुस्तक पुरेशा गुणवत्तेचे असेल तर त्याची इतर भाषांत भाषांतरे होतील किंवा तो ग्रंथकर्ता आज ह्या व्यापक श्रोतृवर्गापर्यंत पोचण्यासाठी इंग्रजीतूनही आपला ग्रंथ प्रकाशित करील.

म्हणजे असे म्हणता येईल, की ज्ञानाच्या व्यवहाराच्या क्षेत्रात ह्या भाषा स्वायत्त आहेत. त्या भाषा बोलणारे लोक परभाषांचे जे साहाय्य घेतात, ते केवळ सोय म्हणून घेतात. मराठीच्या दृष्टीने पाहता ही आदर्श स्थिती आहे आणि ती मराठीच्या बाबतीत साध्य करणे हे आपले ध्येय आहे. अनेक ऐतिहासिक कारणांमुळे पाश्चात्त्य जगात इंग्रजीला जे अनन्यसाधारण स्थान आहे ते, उदा., डच भाषिक मान्य करतात. हे स्थान डच भाषेला नाही याची खंत ते बाळगीत नाहीत. दुसरी गोष्ट अशी, की ह्या भाषांची जी क्षमता आहे आणि त्यांच्यांत उपलब्ध असलेल्या साहित्याची जी संपन्नता आहे ती त्या भाषिकांची कमाई आहे. उदा., ग्रीक वारसा त्यांना लाभला ही त्यांच्या भाषेच्या विकासाच्या दृष्टीने अतिशय अनुकूल अशी गोष्ट होती. पण सांस्कृतिक वारसा पचविल्याशिवाय लाभत नाही. संस्कृतचा संपन्न वैचारिक वारसा मराठी भाषेत कधीही प्रतिर्बिंबित झालेला नाही. अजून नाही. उदा., मराठीत सुरेन्द्रनाथ दासगुप्ता यांच्या 'भारतीय तत्त्वज्ञानाचा इतिहास' ह्या ग्रंथाच्या तोडीचे पुस्तक तर नाहीच पण हिरियण्या यांच्या 'भारतीय तत्त्वज्ञानाची रूपरेखा' या पुस्तकासारखेही पुस्तक नाही. संस्कृतमधील तत्त्वज्ञानावरील ग्रंथांची चोख भाषांतरे मराठीत नाहीत, त्यांच्यावर मराठीत कुणी भाष्ये लिहिली नाहीत. प्लेटोच्या 'रिपब्लिक' वर भाष्ये लिहिणे हा, हॅम्लेटच्या वेडाचा अर्थ लावण्याप्रमाणे युरोपमधील लघु-उद्योग आहे. पाश्चात्त्य तत्त्वज्ञानामध्ये प्लेटोचे जे स्थान आहे तसेच काहीसे स्थान आपल्याकडे शंकराचार्यांना आहे. पण अद्वैताच्या तत्त्वज्ञानाची चिकित्सा करणारी किती पुस्तके आपल्याकडे प्रसिद्ध होतात? आणि बापटशास्त्री किंवा केवलानंद यांची जी थोडी चोख पुस्तके आहेत ती कपाटात पडून राहतात.

भाषिक स्वायत्ततेच्या दृष्टीने आज मराठीची स्थिती काय आहे? प्रथम शिक्षणव्यवस्थेच्या संदर्भात विचार करू. माध्यमिक अभ्यासक्रमात, म्हणजे दहावीपर्यंत मराठी माध्यम म्हणून स्थिर झाली आहे. आधुनिक वळणाचे प्राथमिक गणित - आपल्या मुलांना अभ्यासात मदत करण्याच्या सद्हेतूने ज्या गणिताची पुसतके वाचायला घेतली असता ती आपल्या डोक्यावरून जातात असा अनुभव बहुसंख्य सुशिक्षित पालकांना देणारे गणित -, भौतिकी, जीवशास्त्र, रसायनशास्त्र इ. भौतिक शास्त्रे हे विषय धरून सर्व विषय मराठीतून सुरळीतपणे शिकविण्यात

येतात, कुशल शिक्षक ह्या विषयांतील मूलभूत संकल्पना मराठीद्वारा विद्यार्थ्यांच्या मनांत बिंबवू शकतात आणि हे आकलन कायमची शिदोरी म्हणून विद्यार्थी स्वतःबरोबर नेतात असा अनुभव आहे. सुमारे ४५ वर्षांपूर्वी जेव्हा माध्यमिक शिक्षणक्रमात मराठी माध्यम म्हणून वापरण्याची परवानगी भीतभीत देण्यात आली तेव्हा गणित आणि विज्ञान मराठीतून चांगल्या प्रकारे शिकविता येतील का ह्याविषयी तज्ज्ञांच्या मनात संशय होता. (भारतीय तरुण चांगले सेनाधिकारी होऊ शकतील का किंवा कधी गौरीशंकर शिखरावर चढू शकतील का असा प्रामाणिक संशय ब्रिटीश राज्यकर्त्यांना होता आणि म्हणून ते बिचारे हिंदुस्थानातील उन्हाळा आणि माशा सहन करीत लठ्ठ पगारावर उपाशी जनतेवर राज्य करीत बसत. त्याच प्रकारचा हाही संशय होता.) पण उच्च माध्यमिक शाळांत सर्वत्र-शहरांत आणि ग्रामीण भागांत–विज्ञानशाखेमध्ये इंग्रजी माध्यम आहे आणि मानव्य विद्या (आर्ट्स) व व्यापार या शाखांत मराठी माध्यम ऐच्छिक म्हणून मोठ्या प्रमाणावर रूढ आहे. विद्यापीठीय स्तरावरील परिस्थिती अशीच आहे. म्हणजे पदव्युत्तर अभ्यासक्रमापर्यंत मराठी हे मानव्यविद्या आणि व्यापार ह्या शाखांमध्ये ऐच्छिक माध्यम म्हणून प्रचलित आहे. पण विज्ञानाचे माध्यम केवळ इंग्रजी आहे.

उच्च माध्यमिक अभ्यासक्रमात विज्ञानाचे माध्यम इंग्रजी असण्याचे एक महत्त्वाचे कारण असे, की वैद्यक, अभियांत्रिकी, इ. व्यावसायिक शिक्षणक्रमांचे माध्यम इंगजी आहे. मानव्यविद्या, व्यापार ह्या विद्याशाखांमध्ये मराठी माध्यम म्हणून उच्च माध्यमिक आणि विद्यापीठीय अभ्यासक्रमांमध्ये रूढ असली तरी गौण पर्याय म्हणूनच तिचा स्वीकार होतो. इंग्रजीवर ज्यांचा पुरेसा काबू आहे असे मराठी विद्यार्थी इंग्रजीतून शिकण्याचे पसंत करतात. ह्याचे कारण असे, की देशाचा सर्व उच्च व्यवहार हा इंग्रजीतून होतो. शासकीय, न्यायालयीन, संशोधनात्मक इ. क्षेत्रांतील अखिल भारतीय पातळीचा व्यवहार इंग्रजीतून होतो. ह्या पातळीवरील व्यवहारात स्थान मिळवून ते टिकविण्यासाठी इंग्रजी चांगल्या प्रकारे लिहिताबोलता आली पाहिजे आणि आपल्या विषयाची पुरेशी तयारी असली पाहिजे. इंग्रजी माध्यमातून शिकल्याने ह्या दोन्ही गोष्टी साधू शकतात. इंग्रजीचा सराव होतो, इंग्रजीतून आपला अभ्यासविषय माडण्याची शैली आत्मसात होते आणि विषयाचेही, मराठीतून मिळू शकेल त्यापेक्षा कितीतरी अधिक चोख ज्ञान मिळू शकते. उदा., आय्. ए. एस्. साठी होणा-या स्पर्धात्मक परीक्षेत यश मिळविण्यासाठी विषयाची जी तयारी लागते ती केवळ मराठी पुस्तके वाचून होऊ शकणार नाही. त्यासाठी विषयावरील प्रमाण इंग्रजी पुस्तके वाचावी लागतील. ह्या पुस्तकांतील विवेचन अमूर्त, संकल्पनात्मक, तार्किक पातळीवरचे असते. विवेचनाला तार्किक शिस्त असते. सिद्धांत आणि त्यांना जोडण्यात आलेले श्लेष नेमकेपणे मांडण्यात येतात. पुराव्याचे त्यांना असणारे पाठबळ काळजीपूर्वक जोखण्यात येते. ह्या सर्वांचे व्यवस्थित आकलन ज्याला होऊ शकते त्याचे इंग्रजीचे ज्ञान एवढे असते, की आपले त्या विषयावरील विचार इंग्रजीतून मांडण्याची शक्तीही त्याला असते.

सामाजिक शास्त्रे, इतिहास, तत्त्वज्ञान इ. विषय मराठी महाविद्यालयीन अभ्यासक्रमात शिकविण्याची सोय होऊन तीस वर्षे झाली. पण ह्या विषयांचे ह्या पातळीवर जेवढे ज्ञान अभिप्रेत असते ते चोखपणे मांडणारी पुस्तके मराठीत क्वचितच आढळतात. आता इंग्रजी माध्यमातून ह्या विषयांचा अभ्यास करणारे बहुसंख्य विद्यार्थी त्यांच्यावरील प्रमाण इंग्रजी पुस्तके वाचतात असे अजिबात नाही. ते 'गाइड्स'च वाचतात. इंग्रजीतून शिकणारे बहुसंख्य विद्यार्थी गाइड्स वाचून परीक्षा पास होतात ही वस्तुस्थिती आणि मराठीत ह्या विषयांवर प्रमाण पुस्तके अपवादाने आहेत ही वस्तुस्थिती परस्परसंबंधित आहेत. पण इंग्रजी गाइड्स वाचून पदवी मिळविलेले विद्यार्थी अखिल भारतीय पातळीवर स्थान मिळवू शकत नाहीत. हे साधण्यासाठी कधी ना कधी त्यांना प्रमाण पुस्तकांशी मुकाबला करावा लागतो आणि बहुसंख्य प्रमाण पुस्तके इंग्रजीत असल्यामुळे त्यांना इंग्रजी चांगल्या प्रमारे अवगत असावी लागते आणि अमूर्त, तार्किक बांधणीचा विचार समजून घेण्यासाठी आवश्यक असलेली बौद्धिक शक्तीही त्यांनी कमावलेली असावी लागते. असे विद्यार्थी थोडेच असतात. पण ते भारतात आहेत. त्यांच्यासाठी थोड्या पण खरोखर चांगल्या अशा शाळा आहेत आणि काही थोडी कॉलेजे आहेत

आणि त्यांतून शिकून काही विद्यार्थी आय्. आय्. टी. मध्ये किंवा उच्च विद्यापीठीय शिक्षणक्रमांत प्रवेश घेतात. आर्यभट किंवा 'ॲपल' अवकाशात सोडणारे लोक किंवा संयुक्त राष्ट्रांच्या आंतरराष्ट्रीय 'सिव्हिल सर्विस' मध्ये सेवा करणारे लोक या विद्यार्थ्यांतून येतात.

आपण ही गोष्ट ध्यानात घेतली पाहिजे, की राष्ट्रीय पातळीवरचा बौद्धिक व्यवहार हा आंतरराष्ट्रीय पातळीच्या जवळ कुठेतरी असावा लागतो. नाही तर आपण इतर राष्ट्रांचे मिंधे होऊ. तेव्हा देशातील निदान काही लोक ह्या बौद्धिक पातळीचे असावे लागतात. इंग्रजी चांगल्या प्रकारे अवगत असल्याशिवाय आज ही पातळी गाठता येणार नाही हे उघड आहे. त्यासाठी आवश्यक असलेली ग्रंथसामग्री मराठीत नाही.

आजची आपली शिक्षणव्यवस्था दुहेरी आहे. माध्यमिक स्तरापर्यंत ती एकसंध आहे किंवा होती. पुढे साधारणपणे प्रगत राष्ट्रांतील शिक्षणव्यवस्थेच्या जवळ येईल अशी इंग्रजी माध्यमातून चालविण्यात येणारी एक शिक्षणव्यवस्था आहे; आणि विद्यार्थ्यांना विषयांचे अर्धमुर्धे, अर्धकच्चे ज्ञान देऊन पदवी देणारी आणि तुमचे शिक्षण पुरे झाले, आता तुम्ही बाहेर पडा असे विद्यार्थ्यांना सांगून त्यांना विद्यापीठांतून घालवून देणारी दुसरी एक जुजबी शिक्षणव्यवस्था आहे. मराठी हे ह्या दुस-या शिक्षणव्यवस्थेचे माध्यम आहे. म्हणजे विद्यापीठीय माध्यम म्हणून स्वायत्त नाही.

ह्या जुजबी शिक्षणव्यवस्थेतून बाहेर पडलेल्या विद्यार्थ्यांचा ज्ञानात, विचारांच्या जगात प्रवेश झालेलाच नसतो आणि म्हणून त्यांना पुढे आयुष्यात पुस्तकांची आवश्यकता भासत नाही. तत्त्वज्ञान, सामाजिक शास्त्रे, इतिहास इ. विषयांवर मराठीत पुस्तकांचा ओघ वाहताना दिसत नाही. विद्यापीठांतून बाहेर पडलेल्या सुशिक्षितांचा बौद्धिक परिवार निर्माण झालेला नाही आणि म्हणून ह्या परिवाराचे पोषण करण्यासाठी ग्रंथनिर्मिती स्वाभाविकपणे होताना दिसत नाही.

तेव्हा इंग्रजीच्या मानाने तर राहू द्याच, पण कोणत्याही पाश्चात्त्य भाषेच्या मानाने आपण किती मागे आहोत ह्याची कल्पना येईल. सुशिक्षितांत जोमदार बौद्धिक जीवन नाही; म्हणून टवटवीत, तल्लख, धारदार असे वैचारिक साहित्य मराठीत नाही, ही सुशिक्षितांची गोष्ट. उलट, बहुसंख्य महाराष्ट्रीय समाज निरक्षर किंवा जेमतेम साक्षर आहे. तो मुका आहे. त्याला जे काही घडते ते तो भोगतो. कर्ता होण्यासाठी जे ज्ञान आणि विचार त्याने आत्मसात केले पाहिजेत, ते त्याच्यापर्यंत पोचत नाहीत. ह्या परिस्थितीत ह्या लोकांचे भवितव्य अखेरीस इंग्रजीतून बौद्धिक व्यवहार करणा-या थोड्या लोकांच्या हाती आहे. म्हणजे आपली स्थिती स्वदेशी वसाहतवादाची आहे. परकीय आणि स्वदेशी वसाहतवादातून मुक्तता होण्यासाठी मूलभूत आणि आघाडीवरचे वैज्ञानिक व तांत्रिक ज्ञान आपल्याला जसे आवश्यक आहे, त्याप्रमाणे सर्व प्रकारचे, सर्व पातळयांवरचे ज्ञान सर्वसाधारण लोकांत खेळविणेही आवश्यक आहे. मराठी व इंग्रजी ह्या दोन्ही भाषांना आपल्या सामाजिक विकासात परस्परपूरक आणि महत्त्वाची कार्ये पार पाडायची आहेत. ❖❖❖



अनुक्रमणिका

## लेखकांचा परिचय

✠ **मुखपृष्ठावरील चित्र :**
**चित्रकार -** जितेंद्र अशोक साळुंखे,
**पत्ता :-** मल्हारपुरा, मूक-बधिर विद्यालयामागे, चोपडा, जिल्हा जळगाव - ४२५ १०७.
भ्रमणध्वनी : ९९७०७८३४०५.

✠ **डॉ. राजेंद्र गणेश डोळके**
काही काळ मराठी विषयाचे प्राध्यापक. तसेच मराठी विषयात 'विद्यावचस्पती' ही पदवी प्राप्त. नंतर ते महाराष्ट्र बँकेत अधिकारी होते. महानुभावसाहित्य, संतसाहित्य, विदर्भातील लेखकांचे लेखन, दलितसाहित्य यांचा सखोल अभ्यास.
***पत्ता :–*** उषःकाल ३, फ्लॅट नं १०१, प्लॉट नं. १९/२० परफेक्ट को. ऑ. हौ. सोसा. इंद्रप्रस्त नगर, मोखाडे कॉलेज समोर, नागपूर. ४४००२२. भ्रमणध्वनी : ९४२२१४६२१४.

✠ **प्रा. संतोष शेलार**
इतिहास विभाग, कर्मवीर आबासाहेब तथा ना. म. सोनवणे महाविद्यालय, सटाणा.
email- santoshshilahar@rediffmail.com भ्रमणध्वनी : ९९७५१२४१२०.

✠ **श्री. के. वनपाल**
महाराष्ट्र लोकसेवा आयोगाची परीक्षा देऊन मामलेदार म्हणून नोकरीस सुरुवात केली व पदोन्नती मिळवत ते महसूल खात्याच्या सचिव पदावरून निवृत्त झाले. शेती, शेतकरी व त्यांचे अर्थकारण याची त्यांना तृणमूल स्तरावरून माहिती आहे.
**पत्ता :-** अ-८, रे-व्हेन्यू को. ऑ. हाऊसिंग सोसायटी, गणेशखिंड रस्ता, आय्-सी-एस् कॉलनी. पुणे ४११ ००७. दूरध्वनी - ०२०-२५५३२१४३, भ्रमणध्वनी : ९९२२५०१४६४.

✠ **कै. बाबूराव चंदावर**
भूदान चळवळीतील कार्यकर्ते होते. विनोबा व जयप्रकाश या दोघांचेही ते निकटवर्ती होते. 'नवभारत'चे त्यांनी अनेक लेख लिहिले. २०१६ साली त्यांचे निधन झाले.
**पत्ता :-** सईनगर २, डी-१, फ्लॅट-१३, सिंहगड रोड, पुणे. ४११०३०, महाराष्ट्र.
दूरध्वनी - ०२०-२४२५०६९३.

✠ **प्राचार्य डॉ. पंडितराव शा. पवार**
मराठीचे निवृत्त प्राध्यापक. एम. ए., पीएच. डी. (मराठी); नाशिक जिल्हा मराठा विद्याप्रसारक समाज, नाशिक या संस्थेत ३० वर्षे प्राचार्य. पुणे विद्यापीठाचा उत्कृष्ट प्राचार्य म्हणून पुरस्कार. साहित्य व शिक्षण यांवर लेखन. गेली चाळीस वर्षे उच्चशिक्षण क्षेत्रात कार्यरत.
***पत्ता :–*** ६, ऋषिराज पार्क, अरिहंत नर्सिंग होमजवळ, गंगापूर रोड, नाशिक – ४२२०१३.
दूरध्वनी :– (०२५३) २३४३७८७. भ्रमणध्वनी : ९४२३१८१०८७.

✠ **प्राचार्य डॉ. संग्राम गोपीनाथ थोरात.**
किसनवीर महाविद्यालय, वाई येथे वरिष्ठ विभागात मराठी विषयाचे सहाय्यक प्राध्यापक म्हणून कार्यरत. मराठी विभाग, "लोकशाहीर पुंडलिक फरांदे : व्यक्ती आणि वाङ्मय" या विषयात पीएच. डी. पदवी प्राप्त. विविध वर्तमानपत्रे व नियतकालिकांतून शोधनिबंध प्रकाशित.
***पत्ता :–*** मु. अमृतवाडी, पो. पाचवड, ता. वाई, जि. सातारा. ४१५५१३ भ्रमणध्वनी : ९६०४०४६०८४

## आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ७० वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळ्यांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदानप्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारता'ने कार्य करीत राहावे, असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित वाङ्मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारता'ने पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयांतील ग्रंथालयात अद्ययावत पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील, असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयांतून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांनी आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारता'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारता'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल, त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रु. ४००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारता'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

– संपादक मंडळ

## लेखकांस आवाहन

नवभारत मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण नवभारताकडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी अशी विनंती आहे.

१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.

२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यासह द्यावेत.

३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही याची स्पष्ट कल्पना नवभारतच्या संपादकांना द्यावी.

४. नवभारतमध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात नवभारतमध्ये येईल किंवा येणार नाही हे यथावकाश कळविले जाईल याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.

आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.

– संपादक मंडळ

हे मासिक प्रा. यशवंत कळमकर यांनी सन प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.